

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १९ वे ] जून १९६६ [ अंक ९

नवनाटयातील व्यक्तिदर्शन : : : प्रा. म. ना. लोही
देवि अदिति-अंभृणी यांच्या चढउतारातील
तुलनेत लक्षात येणाऱ्या गोष्टी : : श्री शं. बा. जोशी
मराठीतील दीर्घ कविता : एक चिंतन : : प्रा. गो. म. कुलकर्णी
केशवसुतांच्या कवितेचा जन्महेतू : ( पूर्वार्ध ) : प्रा. एस्. एस्. भोसले
संस्कृत काव्यान्तर्गत कथावस्तूमधील : :
बदल व काव्यात्मता : : : प्रा. साधना जनार्दन उपाध्ये
कवी शिवराम किंकर : : : : प्रा. भाऊ मांडवकर
तंजावरस्थ कवि शेषकृत- : : : :
भावार्थ रामायणाचे चौथे अज्ञात उत्तरकांड प्रा. वसंत स. जोशी
पिंगा : एक अभिनव अर्थाविष्कार : : : प्रा. म. ल. वराडपांडे
मराठी साहित्यसमीक्षेचे दृष्टिकोन १९२० ते १९४० प्रा. रा. ग. जाधव
वाचकांचा-पत्रव्यवहार : : : :
पुस्तक-परामर्श : : : :
सारसंकलन- युरोप व भविष्यकाळ.

वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

# नवभारत

वर्ष एकोणिसावे
अंक नववा

जून
१९६६

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक


| | | |
|---|---|---|
| नवनाटयातील व्यक्तिदर्शन | प्रा. म. ना. लोही | १–३ |
| देवि अदिति-अंभृणी यांच्या चढउतारातील तुलनेत लक्षात येणाऱ्या गोष्टी | श्री. शं. बा. जोशी | ४–८ |
| मराठीतील दीर्घ कविता : एक चिंतन | प्रा. गो. म. कुलकर्णी | ९–१३ |
| केशवसुतांच्या कवितेचा जन्महेतू : ( पूर्वार्ध ) | प्रा. एस्. एस्. भोसले | १४–१७ |
| संस्कृत काव्यान्तर्गत कथावस्तूमधील बदल व काव्यात्मता | प्रा. साधना जनार्दन उपाध्ये | १८–२७ |
| कवी शिवराम किंकर | प्रा. भाऊ मांडवकर | २८–३० |
| तंजावरस्थ कवि शेषकृत– भावार्थ रामायणाचे चौथे अज्ञात उत्तरकांड | प्रा. वसंत स. जोशी | ३१–३९ |
| पिंगा : एक अभिनव अर्थाविष्कार | प्रा. म. ल. वराडपांडे | ४०–४४ |
| मराठी साहित्यसमीक्षेचे दृष्टिकोन १९२० ते १९४० | प्रा. रा. ग. जाधव | ४५–५३ |
| वाचकांचा–पत्रव्यवहार | | ५४–५५ |
| पुस्तक–परामर्श | | ५६–६१ |
| सारसंकलन– युरोप व भविष्यकाळ | | ६२–६५ |


वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, 'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २
फोन नं. ३५४८५

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| साधी बांधणी ... | ... ... | ८०·०० |
| कापडी बांधणी ... | ... ... | १०४·०० |
| (२) धर्मकोश– उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| साधी बांधणी ... | ... ... | १५०·०० |
| कापडी बांधणी ... | ... ... | १८२·०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला | .... | ४५·०० |
| कापडी बांधणी ... | .... ... | ५३·०० |
| (४) मीमांसादर्शन ... | ... ... ... | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ६ | | २३०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | ... | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः | .... .... | ६·०० |
| (८) हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ... | २०·०० |
| (९) वैदिक संस्कृतीचा विकास | ... .. ... | ५·०० |
| (१०) नवमानवतावाद | ... ... ... | ६·०० |
| (११) मानवाचा आदर्श ... | ... ... ... | २·५० |
| (१२) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | ... | २·०० |
| (१३) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) | ... | २·०० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ( श्री. चा. अ. दाभोलकर ) | .... | २·०० |

प्रा. म. ना. लोही

# नवनाट्यातील व्यक्तिदर्शन

नाटक या वाङ्मयप्रकारात नाट्य हे प्रधान असले तरी व्यक्तिदर्शन हे दुय्यम ठरत नाही. व्यक्तिदर्शनातूनही नाट्याविष्कार घडविता येतो. किंबहुना, नाट्य आणि व्यक्तिदर्शन यांच्या समसमासंयोगातूनच अविस्मरणीय नाट्यकृती निर्माण होते. शेक्सपियरचा भर नाट्यनिर्मितीवर असूनही व्यक्तिदर्शन घडविण्यात त्याने असामान्य चातुर्य दाखविले आहे. इब्सेनने व्यक्तिदर्शनाला नाट्याची जोड दिली. प्रत्येक व्यक्तीचे अंतर्बाह्य दर्शन घडविले. सर्वांगीण व्यक्तिदर्शन नाटकातून घडविणे ही एक तारेवरची कसरत आहे हे खरेच. कारण कथाकादंबरीप्रमाणे लेखकाला आपले अस्तित्व नाटकात प्रगट करता येत नाही. कथानकातील प्रसंग अगर घटना स्वभावदर्शनाला असमर्थ किंवा अपूर्ण वाटत असतील तर कादंबरीकार किंवा कथाकार स्वतःच त्या व्यक्तीच्या स्वभावाविषयी निवेदन करतो. अलीकडे हा प्रकार कमी झाला असला तरी प्रसंगी ते तेवढी मुभा घेऊ शकतात. उलट, नाटककाराला जे सांगावयाचे असेल ते संवाद व कृतीच्या माध्यमातूनच व्यक्त करावे लागते. फार तर स्वगत भाषणाचा त्याने उपयोग करावा. त्यामुळे नाटकातून व्यक्तिदर्शनाला मर्यादा पडतात असे साहित्यिकांनाही वाटते. तरीही नव्या दमाचे नाटककार व्यक्तिदर्शनाबाबत नवे प्रयोग करीत आहेत. त्याबद्दलचा विचार प्रस्तुत लेखात अभिप्रेत आहे.

### व्यक्तिदर्शन : जुने-नवे

किर्लोस्करांपासून रांगणेकरांपर्यंत मराठी नाटककारांनी अनेक अविस्मरणीय व्यक्तिरेखा निर्माण केल्या. काळ आणि परिस्थिती यात कितीही बदल झाला तरी माणसाच्या सहजप्रवृत्ती ( Instincts ) कधी बदलत नाहीत. आणि व्यक्तिदर्शनाची परिणामकारकता सहजप्रवृत्ती व स्थिरभावना ( Sentiments ) यांच्या वास्तव आणि प्रभावी चित्रणावर अवलंबून असते. असे असूनही जुन्या व नव्या नाटकातील व्यक्तिदर्शन भिन्न का व कसे? असा प्रश्न विचारला जाण्यासारखा आहे. या भिन्नतेला पहिले कारण मानसशास्त्रातून उद्भवलेला नवमतवाद आणि मनोविश्लेषणवाद हे होय. मनोविश्लेषणाचे शास्त्र जसजसे प्रगत झाले तसतसा मानवी मनाच्या गुंतागुंतीवर नवा प्रकाश पडला. व्यक्तिदर्शन म्हणजे बाह्यांग दर्शनच नव्हे तर अंतरंगदर्शन अशी नवी विचारसरणी पुढे आली. माणसाचे एक वेगळेच अंतर्विश्व असते असा नवा शोध लागला. आणि या अज्ञात विश्वाच्या शोधात लेखक दंग झाले. जुन्या लेखकांना मानवी मनातील गुंतागुंतीची कल्पना असली तरी तिचा उकल करण्याचा पद्धतशीर प्रयत्न त्यांच्याकडून कधीही झाला नाही. बालकाची प्रभुत्वाकांक्षा व मोठ्या माणसाची कामवासना यांचा जीवनावर काय परिणाम होतो याचा शोध जसा जुन्यांना लागला नाही तसाच माणसांच्या व्यक्तित्वात एकसंधीपणा नसून त्यात वेगवेगळे थर असू शकतात याचीही जाणीव त्यांना झाली नाही. त्यामुळे कोणतीही व्यक्ती केवळ सुष्ट किंवा दुष्ट अशी साचेबंद असते अशाच कल्पनेतून जुन्या नाटककारांनी व्यक्तिदर्शन घडविले. उलट, या नवीन शोधाच्या अनुषंगाने नवे नाटककार पुढे सरसावले आणि त्यांनी माणसाच्या स्वभावातील अंतर्विरोधाचे चित्रण करावयाला सुरुवात केली. सुरुवातीला रूपांतरित व अनुवादित नाटकातून हा प्रवाह मराठीत आला व तो आता चांगलाच रुजला.

मनोविश्लेषणवादातून आणखी एक नवा प्रवाह उत्पन्न झाला. तो म्हणजे नाटकातून सामान्यांचे, व्यंगपूर्ण व्यक्तींचे, मानसिक विकृती असलेल्या स्त्री-पुरुषांचे चित्रण केले जाऊ लागले. पूर्वी कोणतेही शारीरिक अथवा मानसिक व्यंग हा विनोदाचा विषय ठरे. इंदुबिंदूचा कुरूपपणा, गोकूळचा विसरभोळेपणा किंवा तात्या-बाळाभाऊ यांचा छांदिष्टपणा हे गडकऱ्यांना विनोदविषय वाटले तर ताईच्या कुरूपपणात बाळ कोल्हटकरांना शोकांतिकेचे बीज गवसले, छांदिष्टपणातून पु. ल. देशपांडे यांनी भावनोत्कट नाट्याचा आविष्कार घडवला. ही दृष्टिकोनाची भिन्नता नव्या मानसशास्त्रातूनच जन्माला आली. व्यक्तिदर्शनाच्या कक्षा विस्तारल्या. ‘ दुरितांचे तिमिर जावो ’ मधील अर्धवट दिगू, ‘ वेड्याचे घर उन्हात ’ मधील वेडा दामू, ‘भारतीची’ मुकी नायिका ‘ भारती ’ आणि ‘ राणीचा बाग ’ ची आंधळी नायिका उमा ह्या व्यक्ती कुठल्यातरी जुन्या नाटककाराने नायक म्हणून पत्करल्या

असल्या का ? त्यांना प्राधान्य देण्यात नाटककारांची जीवनाशयातील खोल बुडी स्पष्ट होत नाही काय ? हा धीटपणा परप्रत्ययनेय असला तरी नवीन आणि स्तुत्य आहे. त्यामुळे व्यक्तिदर्शनाला सघनता ( Solidity ) प्राप्त झाली आहे.

हल्लीच्या नाटकातील व्यक्तिदर्शनाची भिन्नता त्यातील अंतर्विरोधाच्या, मानसिक संघर्षाच्या वापरामुळे निर्माण झाली आहे. जुने नाटककार मानसिक चलबिचल दाखवीत. शेक्सपियरच्या नाटकातील हॅम्लेट, मॅक्बेथ किंवा लेडी मॅक्बेथ-यांच्या व्यक्तिरेखा मानसदर्शनामुळे अविस्मरणीय ठरल्या आहेत. खाडिलकरांच्या व गडकऱ्यांच्या नाटकांतूनही ही मानसिक चलबिचल दिसून येते. तथापि माणसाचे एक स्वतंत्र अंतर्विश्व असते ही जाणीव जुन्या नाटककारांत दिसत नाही. माणसाच्या दबलेल्या, दडपलेल्या भावनांचा जाणीवपूर्वक आविष्कार करण्याचा फारसा प्रयत्न दिसत नाही. ' स्वप्नींचे हे धन ' मधील अण्णांच्या मनाचा कोंडमारा किंवा 'तुझे आहे तुजपाशी' मधील आचार्यांचा अहंकारापोटी जन्माला आलेला दांभिकपणा यांचे चित्रण करताना नाटककारांनी जे कौशल्य दाखविले आहे ते खरोखरीच स्पृहणीय आहे. ' मधल्या भिंती ' मधील पार्वती ही जशी Ego instinct मुळे वेगळीच भासते तशीच ' बाधा ' मधील तारा ही सूडोत्पन्न स्वैराचारामुळे नजरेत भरते. या सर्व व्यक्तिरेखा शास्त्रीय दृष्टिकोनातून पाहिल्यास दोषरहित ठरणार नाहीत; परंतु व्यक्तिदर्शनाचे हे नवे प्रयोग म्हणून त्याकडे पाहणे आवश्यक आहे.

व्यक्तिदर्शनाच्या जुन्या व नव्या पद्धतीतील एक महत्त्वाचा फरक असा की जुन्या नाटककारांनी निर्मिलेल्या व्यक्तिरेखा म्हणजे नमुने ( Types ) होते. ( आदर्श पतिव्रता सिंधु, वसुंधरा, सैरंध्री, तारामती इ० उलट्या काळजाचे खलनायक—कीचक, वृंदावन, घनश्याम इ. धीरोदात्त नायक—कोदंड, रामशास्त्री, धर्मराज, हरिश्चंद्र इ.) प्रत्येक व्यक्ती ही कुठल्या तरी साच्यात बसत असे. तिचे आचारविचार विशिष्ट प्रकारचे असत. चांगल्या व्यक्तीच्या मनात वाईट विचार चुकून डोकावत नसे तर खलनायकाच्या मनात सद्विचार चुकून येत नसे. कोणतीही व्यक्ती पूर्णपणे सत्त्वगुणी किंवा तमोगुणी असू शकत नाही. प्रत्येकाच्या मनात चांगले वाईट विचार येतात आणि प्रसंगी तदनरूप वर्तनही घडत असते याची दखल जुन्या नाटककारांनी कधीच घेतली नाही. मन हे अत्यंत चंचल असते. हा सिद्धान्त श्रीकृष्णानी अर्जुनाला सांगितला. त्याची पुष्टी करणारी अनेक उदाहरणे आपल्या पुराणातून आढळतात. पण आपल्या कलाकारांचे लक्ष मात्र तिकडे पाश्चात्य वाङ्मयाने वेधले ही गोष्ट सत्य आहे.

नवीन नाटकातील व्यक्तिदर्शनावर अधिक प्रकाश टाकण्यासाठी काही व्यक्तिरेखांचा विचार करू. 'वेड्याचे घर उन्हात' या नाटकातील दादा ही मध्यवर्ती व्यक्तिरेखा पाहा. दादा ही व्यक्ती घरातील मोठी व कर्ती. अत्यंत अहंमन्य आणि सत्तालोलुप दादा दामोदरपंतांचे वर्चस्व सहन करू शकत नाही. ते म्हणतात, "आमची सत्ता, आमचा अधिकार, आमची माणसं बळकावून आम्हाला हाकलून द्यायला बघतो आहे ... " आपल्या तंत्राने सर्वांनी वागावे अशी त्यांची अपेक्षा. दामूला बासरीचा व गाण्याचा नाद. म्हणून त्याला घराबाहेर हाकलून देतात. परंतु लहान वयात त्याच्या कोवळ्या मनावर बापाच्या गाण्याच्या नादातून आईच्या झालेल्या हालांचा परिणाम हेच कारण असते. दामूला हाकलल्यावर तो परत येत नाहीसे पाहून त्यांच्या मनातील सुप्त ममता जागृत होते. दामूचे काय झाले असेल, हा विचार त्यांना सारखा अस्वस्थ करतो. आणि शेवटी त्याचा परिणाम त्याना वेड लागण्यात होतो. दामूच्या भवितव्याचा दादाना लागलेला ध्यास आणि आपल्या कल्पनाचित्रापेक्षा विपरीत परिस्थितीत दामूला पाहून त्यांचा झालेला अपेक्षा-भंग, यामुळे त्यांना वेड लागते. हा दादाच्या मनःस्थितीतील बदल अत्यंत हळुवारपणे दाखवावा लागला आहे. त्यांच्या स्वभावातील परस्पर विरोधी घटकही तसेच कुशलतेने दाखवले आहेत. दादांना गायनाचे वावडे नाही. पण गायनाच्या नादामुळे आपल्या आईच्या आयुष्याची झालेली परवड पाहून गायनाविषयी दादांच्या मनात तिरस्कार निर्माण व्हावा, यात अस्वाभाविक काही नाही. भूतकाळात घडलेल्या कटु घटनांची पुनरावृत्ती होऊ नये अशी त्यांची प्रामाणिक व रास्त इच्छा असते. त्यामुळे गायनविरोधाचा मुखवटा चढवून ते घरात वावरत असतात. तंबोरा दिसला की त्यांच्या तळपायाची आग मस्तकाला जाते. केवळ आततायीपणामुळे ते दामूला घालवून देतात आणि तो गेल्यानंतर "आमच्यामुळे दामू देशोधडीला लागला " असे म्हणत झाल्या गोष्टीचा पश्चा-










त्ताप करीत बसतात. किंबहुना, त्याना तो ध्यासच लागून जातो. त्यांच्या कल्पनेतला दामू वेडपट, पराधीन, दुःखी असतो. परंतु, प्रत्यक्षातला दामू श्रीमंत, दिलदार आणि सुखी असतो. हे नवीन व अनपेक्षित स्वरूप त्यांच्या अहंभावनेला दुखावते. त्यामुळे त्यांचा क्रोध उफाळून येतो. आणि कोणतीही भावना अतिरेकाला गेली की बुद्धिभ्रंश व्हायचाच. दादांचीही तीच गत झालेली आहे. अशा प्रकारची व्यक्तिरेखा नाट्य-वाङ्मयात ( मराठी ) अपूर्वच नाही का ?

'दुरिताचे तिमिर जावो' या नाटकात शारीरिक आघात व प्रत्याघात यांचा मानसिक परिणाम चित्रित केला आहे. लहानपणी झालेल्या अपघाताने दिगू हा जडबुद्धी व व्यवहारशून्य बनतो. परंतु, आईचा मृत्यु आणि वरून बसलेला बेदम मार यामुळे त्याची गेलेली बौद्धिक शक्ति परत मिळते. शेवटी तर तो आपल्या आत्मसमर्पणाने सर्वांना विस्मित करून स्वतःविषयी प्रगाढ सहानुभूति निर्माण करतो. दिगूच्या चित्रणात बरीच विसंगती असली तरीही ती व्यक्तिरेखा अविस्मरणीय आहे. 'मधल्या भिंती' मधील पार्वती ही अशीच विक्षिप्त पण प्रातिनिधिक आहे. आपला गरीबीचा संसार समंजसपणाने रेटणारी आणि आपल्या पतीवर व अपत्यांवर प्रेमळ प्रभुत्व गाजवणारी ही बाई मुलाने इच्छेविरुद्ध निर्णय घेताच वाघिणीसारखी चवताळते. मातेची ममता अहंभावनेत विरघळून जाते. लग्न करून आशीर्वाद मागायला आलेल्या लेकसुनेला लाथाडते. "तुझी आई मेली. भूत उरलं आहे तिचं. त्याला ना माया ना दया" असे मुलाला बजावणारी पार्वती वेळ येताच सुनेलाही जवळ करते; वाटल्यास मुलाला अव्हेरते. तिची विविध रूपे पाहून प्रेक्षक गोंधळून जातो. एका क्षणाला तिच्याबद्दल तिरस्कार वाटतो तर दुसऱ्या क्षणाला आदर. ही व्यक्ती ( पार्वती ) पाहिल्यावर व समजल्यावर मनाला प्रसन्नता वाटते. काहीतरी नवीन तरीही अपेक्षित दिसल्याची जाणीव होते. क्षणाक्षणाला नवे रूप धारण करणारी पार्वती ही केवळ प्रेक्षकाला थक्क करून सोडत नाही तर त्याला विचार करायला लावते. अशा प्रकारचे व्यक्तिदर्शन पूर्वी झाले होते का, असाही प्रश्न पडतो. आणि त्याचे उत्तर नकारात्मक देण्याशिवाय गत्यंतर नाही.

## स्वैर वर्तनाचे चित्रण

व्यक्तिदर्शन घडवीत असताना आणखीही एका अंगाचा विचार नव्या नाटककारांनी केलेला दिसतो. तो प्रयत्नही धाडसी म्हणावा लागेल. ज्याला समाज अनैतिक आणि म्हणून बहिष्कृत समजतो असा स्त्रीपुरुष-संबंध आता नाटककार दाखवू लागले आहेत. ही प्रवृत्ति देखील परप्रत्ययनेय असून नाट्यमन्वंतराच्या कालापासून तिचा आविर्भाव मराठी नाटकात सुरू आहे. समाज हा पुरुषांच्या स्वैराचाराला महत्त्व देत नाही उलट स्त्रीच्या स्वैराचारावर वादळ उठवतो. तथापि, आजच्या परिस्थितीत प्रौढ कुमारिकांना तर सोडाच पण विवाहितांनाही आपले मन ताब्यात ठेवणे किती कठीण आहे ? त्यांच्या मनाची तळमळ व तगमग किती काळ दाबून ठेवणार ? आजच्या आर्थिक कोंडीतून वाट काढीत असताना पालकांना जसे आपल्या तरुण मुलींना चार भिंतीच्या आत डांबून ठेवता येत नाही तसेच त्यांचे झटपट लग्नही उरकून टाकता येत नाही. त्यामुळेच प्रेमविवाहांचा आणि कुमारी मातांचा असे दोन प्रश्न उपस्थित होतात. विधवा व परित्यक्तांचा प्रश्नही सुटलेला नाहीच. तरीही या प्रश्नांचा ऊहापोह समाजाला मोठासा रुचत नाही. आपल्या प्रेमाला लाथाडणाऱ्या पुरुषजातीवर सूड उगवण्यासाठी 'बाधा' ची नायिका तारा जे स्वैर वर्तन करते त्याचे दर्शन जुन्या नाटककारांनी निश्चितच टाळले असते. अशा घटना घडतच नाहीत असे नाही. आणि सत्याविष्कार करताना नवा नाटककार कचरत नाही. म्हणूनच हे एक नवीन अंग प्रकाशात आणण्याचा प्रयत्न. एखादी तारा स्वच्छंदीपणाने वागत राहते तर एखादी बेबी ( वर्तुळाचे दुसरे टोक ) आत्महत्येला प्रवृत्त होते. आजच्या समाजात चांगल्या पतीकडे पाठ फिरवून छचोर माणसांच्या नादी लागणाऱ्या 'विषया' ( विषकन्या ) अगदीच नाहीत असे नाही. तरीही आपले नाटककार अशा दर्शनाच्या वेळी कचरतात. हे अमान्य करता येत नाही. पिनरो याने ज्या धडाडीने अशा प्रकारचे व्यक्तिदर्शन घडवले आहे ती धमक जशी पुरुषात नाही तशी स्त्रियातही दिसून येत नाही. आणि याला कारण भारतीय संस्कृतीचा प्रभाव हेच म्हणावे लागेल !

अशा तऱ्हेने मराठी नवनाट्यात ( नवीन नाटकात ) व्यक्तिदर्शनाच्या कक्षा विस्तारत आहेत ही गोष्ट अभिमानास्पद आहे.



अनुक्रमणिका

श्री. शं. बा. जोशी

# देवि अदिति–अंभृणी यांच्या चढउतारातील तुलनेत लक्षात येणाऱ्या गोष्टी

" देवमाता " म्हणून अदितीची कितीही स्तोत्रे गाण्यात आली असली तरी, वेदकाळाच्या अखेरीस ही देवी अस्तंगत होते ! कठोपनिषदात पुरुषाची " प्रकृति " असा एक सूचक उल्लेख आढळतो (४·७) उपनिषदातील इतर एक-दोन उल्लेख म्हणजे ऋग्वेदातील ऋचांची पुनरुक्तिच होय. ( जै. उ. १·१४१-४; )

वेदाव्यतिरिक्त इतर कोठेच अंभृणीचे नाव आढळत नाही; पण अदितीपेक्षा अत्यंत उज्वल स्वरूपात ही प्रकट होऊन अद्वितीय झाली आहे. तरीपण वेदाबाहेर, उपनिषदातसुद्धा पुढे ही देवी कोठेच दृष्टीस पडत नाही ! आणि अंभृणीचे, असे हे संपूर्णतः दृष्टीआड होणे, ही एक आश्चर्याची गोष्ट आहे !

अदिति- अंभृणी या देवी लुप्त होण्याच्या सुमारास, श्रीलक्ष्मी क्षितिजावर विराजमान होते ! वेदाच्या खिल -भागात, शेवटी परिशिष्टात असलेले श्रीलक्ष्मीसूक्त अभ्यासूंचे चित्त वेधून घेते. वेदाच्या शेवटी अवतरलेली श्रीलक्ष्मीदेवी, आजही आसेतुहिमाचल भारतीयांची पूज्य आराध्यदेवता आहे; परंतु वेदामध्ये तळपलेल्या अदिति, अंभृणी या दोघीही, त्यानंतर श्रीलक्ष्मीस मार्ग खुला करून, आपण अदृश्य होतात. हे स्थित्यंतर अहेतुक वा निष्कारण झाले, असे म्हणता येईल का ? नसेल तर, ह्या बदलामागे कारण काय असेल ?

वेदात वर्णिलेल्या देवींमध्ये, आजही ज्या अस्तित्वात आहेत, त्यापैकी सरस्वती ही एक होय. सरस्वतीच्या स्थित्यंतराचा अर्थ जाणून घेण्यासाठी या देवीच्या सूक्तांची समीक्षा पुढे येणार आहेच.

प्रस्तुत श्रीलक्ष्मी देवीने आज आपल्या महिम्याने वेदकालीन सरस्वतीलासुद्धा मागे सारले आहे, ही गोष्ट अमान्य करणे म्हणजे, सत्य नाकारणेच होय. ज्ञानाचे प्रतीक असलेली सरस्वती वैभवसंपत्तीच्या देवता श्रीलक्ष्मीप्रमाणे सामान्य जनांचे आराध्य दैवत बनणे शक्य नाही, हे उघड आहे. यामुळेच सामान्य जनतेला, सरस्वतीपेक्षा श्रीलक्ष्मीची थोरवी विशेष वाटणे साहजिक आहे. शिवाय श्रीलक्ष्मी ही, आजच्या नैतिक कल्पनांच्या आदर्शांत रूपांतरित केली गेली आहे; हेही या देवीच्या लोकप्रियतेचे एक महत्त्वाचे गमक होय. सरस्वतीचा पति समजला गेलेला ब्रह्म, आणि ही देवी सरस्वती यांच्यामधील संदिग्ध नैतिक संबंध प्रचारात आणणाऱ्या पुराणकथा, या संदर्भांत अभ्यसनीय आहेत. ब्रह्म हा सृष्टिकर्ता होय असा संकेतसमय रूढ असलेल्या काळात प्रचलित होणारी कथा आहे ही ! म्हणून ब्रह्माची कन्या सरस्वती; अशीही एक पुराणकथा आहे. या पिता–पुत्रीची जोडी, पति-पत्नीही आहे. अशा प्रचाराला कारण पुराणातील एक कथा होय. पण श्रीलक्ष्मीबद्दलही याच प्रकारच्या कथानिर्मितीस आवश्यक अशी हवी तेवढी सुफल पार्श्वभूमी असूनही, त्या प्रकारच्या पुराणकथा प्रचारात आल्या नाहीत ! याचे कारण स्पष्टच आहे: पुराणलेखकात ब्रह्म–सरस्वती संप्रदायाबाहेरचे, म्हणजे विष्णुसंप्रदायाचे पक्षपातीच प्रमुख असले पाहिजेत. या ब्रह्म–सरस्वतींच्या अनैतिक संबंधाची कथा निर्मिणाऱ्या पुराणकारांनी सरस्वती ही, श्रीलक्ष्मीपेक्षा खालच्या दर्जाची देवी, असा प्रचार केल्याप्रमाणे होत नाही का ? वेदकाळानंतर नैतिक कल्पनात झालेल्या परिवर्तनावर या पुराण–कथा चांगलाच प्रकाशझोत टाकतात.

याबरोबरच त्याकाळी प्रारंभ झालेली देवतासंप्रदायामधील स्पर्धा–ईर्षाही, काही प्रमाणात उघडकीस येत आहे.

(i) " देवमाता " अदितीला **"माता रुद्राणाम्"** असे म्हणण्यात रुद्र–शिव सांप्रदायिकांचा हात असल्याचे दिसते. इंद्रादींची माता असे वर्णिलेल्या अदितीस रुद्राची पत्नि, असे म्हटल्यामुळे याजक संप्रदायाच्या



अनुक्रमणिका

दैवतांचा पिता रुद्र–शिव, असे ध्वनित करण्याचा उद्देश येथे नसेल काय? 'कद्रुद्राय' या सुप्रसिद्ध सूक्तात अदितीचा उल्लेख येतो. पति–पत्नी संबंधाचा स्पष्ट उल्लेख नसला तरी रुद्राची औषधे देणारी त्याची सहचरी असल्याची निश्चित सूचना दिसते. (I.४३.२.) हा उल्लेख पहिल्या मंडलात आहे!

(ii) ऋग्वेदात 'अदिती'ला रुद्रपत्नी बनवण्याचा प्रयत्न आढळून येतो, तर यजुर्वेदात अदितीला विष्णु-पत्नि असे दर्शविण्याची प्रवृत्ती दिसून येते! ऋग्वेद व यजुर्वेदाच्या या दोन्ही उल्लेखावरून त्या रुद्र आणि विष्णुसंप्रदायातील त्या काळातील ईर्षाच व्यक्त होत नाही का?

याप्रमाणे रुद्र व विष्णु देवता पंथातील ईर्षा–स्पर्धेचा विषय बनलेली 'अदिती' जनात पूज्यदैवत म्हणून फार काळ राहणे शक्य नाही, हे उघडच आहे. रुद्रादि बऱ्याच देवगणांची सांगाती अंभृणीदेवीही, सर्वमान्य न होण्याचे कारण याच प्रकारचे असावे असा अंदाज करण्यास हरकत दिसत नाही. माध्वसंप्रदायाबाहेर अंभृणीसूक्त नित्य आह्निकात असणाऱ्या परंपरा विरळाच होय. विशिष्ट सिद्धीच्या उपासनेसाठी या सूक्ताचा विनियोग होतो ही गोष्ट वेगळी. या देवीच्या निरनिराळ्या सांगाती आत्मीय देवगणात 'रुद्रियां'चे नाव सर्वप्रथम आहे! रुद्रासाठी ही देवी, धनुष्य सज्ज करते! हे तर निःसंदिग्धच आहे. परंतु मध्व-संप्रदायाच्या श्रद्धेप्रमाणे, अंभृणी ही विष्णुपत्नी होय! यामुळे प्रश्न उत्पन्न होतो की या देवीचा पती कोण? पण याबद्दल स्पष्टता कोठेच नाही!

श्रीलक्ष्मी-प्रतिमानिर्मितीतही ही संदिग्धता आहे किंवा नाही हे निश्चित करण्यासाठी श्रीसूक्ताचे समालोचन आवश्यक ठरते. पण त्यापूर्वी "अदिती"च्या उन्नतीचा व ऱ्हासाचा हा चढउतार अवलोकि-ल्यास या देवतानिर्माणामागील पक्षपाती तारतम्यभाव आणखी स्पष्ट होणार आहे.

"रुद्राणां माता" असे वर्णिलेल्या अदितीचे पुत्र मरुत हे सरळ "आदित्य" होत. कारण "आदित्य" पदाचा मूळ अर्थच "अदितीची मुले" असा आहे. हे सर्व तज्ञांनी मान्य केले आहे.

पण, मरुत हे, 'आदित्य' असे मानल्यास, हे रुद्रीय, इंद्र वरुण विष्णू प्रभृती वरच्या दर्जाचे म्हणून मानले गेलेल्या देवांच्या पंक्तीत येतात. याशिवाय, रुद्र हा, अदिनिपुत्र–आदित्यांचा पिता, तसा इंद्र वरुण विष्णु प्रभृती सर्व देवतांपेक्षा श्रेष्ठ परमेश्वर ठरतो!

अशा प्रकारे रुद्र व मरुतांना इंद्रादिदेवतांपेक्षा श्रेष्ठ अशा महोन्नत स्थानी कल्पून त्यांची आराधना करणारा एक प्रबळ संप्रदाय ऋग्वेदकाळातच होता असे यावरील सूचक उल्लेखावरूनच उघड होते!

पण रुद्र–शिवाला इंद्र व विष्णूच्या समान पातळी वरील देव असे मानायला, याजक संप्रदायातील प्रमुख शिष्ट ( elites ) तयार नव्हते, असे दिसते. रुद्राला, विष्णूप्रमाणे सोमपानासाठी इंद्रादींच्या बरोबर आमंत्रि-ल्याचे कुठेही आढळत नाही. इंद्रा–विष्णुप्रमाणे, इंद्रा–रुद्रा असे संयुक्त दैवत, ऋग्वेदात कोठेही आढळत नाही. तरीही सोमा–रुद्रा हे जोड दैवत आहे, हे विस-रून चालणार नाही. आणि रुद्र हा शेवटी, सोम–नाथ झाल्याचे दिसते! यज्ञात रुद्राला स्थान नाही; पण ब्राह्मणरचनाकाळी विष्णूच यज्ञ–स्वरूप होतो! व इंद्र–सखा विष्णु इंद्रास मागे टाकतो. देवातील 'प्रथम' आपण होतो; एवढेच नव्हे, तर ज्या यज्ञात इंद्राला सोम मिळे, तो यज्ञही आपणच होतो, व इंद्राच्या सोम-पानाचे केंद्र नाहीसे होते. अशाप्रकारे रुद्र व विष्णु अग्न्याराधकांच्या मर्मस्थानीय सोम व यज्ञ आपल्यात सामावून घेतात! अंभृणीसूक्तात ध्वनित होणारा 'इंद्राग्नींचा' पाडाव ब्राह्मणकाळी पूर्ण होतो. केनोप-निषदात याचे स्पष्ट प्रत्यंतर मिळते.

रुद्रियांचा, 'अदितिपुत्र' असा उल्लेख एकदाच आलेला आहे. ( VIII. १०१.१५ ) असेच मरु-तांचा 'आदित्य' असा उल्लेख केवळ एकदाच; तोही दहाव्या मंडलात आहे. ( X. ७७.८. ) ऋग्वेदकालीन वैचारिक आणि सामाजिक स्थित्यंतर-सूचक या घटना अभ्यसनीय आहेत. मरुतांना 'आदित्य' असे म्हटल्याने, ते मरुत् विष्णूच्या बरो-बरीचे ठरतात! पण आजच्या माध्व–वैष्णव संप्रदाया-मध्ये मरुतांना "परिवार" देवता असे मानले गेले आहे; शिवाय मरुत्पुत्र मारुती ( हनुमान् ) हा, ( विष्णूचा अवतार म्हणून मानला गेलेल्या ) रामाचा सेवक होय!



अनुक्रमणिका

'अदिती ही मरुतांची आई' ( माता रुद्राणां ' ) असे म्हटल्याने मरुतांच्या वाट्याला येणारा थोरपणा अमान्य असणारा पक्ष बळाऊ लागतो असे दिसते. कारण गणना करणारी एक कथा बऱ्याच काळापासून प्रचारात असल्याचे दिसून येते. सायणांनी ऋग्भाष्यात एके ठिकाणी ही कथा ठासून सांगितली आहे. ( I. ११४.६ )

( ii ) " इदं पित्रे मरुतां उच्यते वचः " या ऋचेवर भाष्य करताना सायणांनी या कथेचे निरूपण केले आहे.

रुद्र हा मरुतांचा ' जनिता ' ( जनक ) नव्हे; तर तो त्यांचा " पिता " ( पालयिता ) हे कसे ? व का ? या विवरणासाठी सायणांनी ही कथा सांगितलेली आहे; ती अशी :–

दितीला इंद्रहननाचे सामर्थ्य असणारा पुत्र व्हावा, असे डोहाळे लागले. इंद्राला ही गोष्ट समजली; तेव्हा, सूक्ष्मरूप धारण करून तो दितीच्या गर्भात शिरला; व गर्भाचे सात तुकडे केले. तेवढ्यानेही समाधान न होता त्याने पुन्हा त्या सात तुकड्यातील प्रत्येकाचे परत सात-सात तुकडे केले. नंतर गर्भाचे ते तुकडे एकेक बाहेर आले व आक्रंदू लागले. त्याचवेळी लीलार्थ परमेश्वरासमवेत विहारास निघालेल्या पार्वतीस या अर्भकांचे हे दीन रोदन ऐकू आले व ती अतिशय कळवळली. तिचे मातृत्व जागे झाले. परमेश्वराच्या संमतीने, तिने कंद आणून त्यांचे लालन-पालन केले व त्याना वाढवले. ही सारी मुले समान भावाने व एकोप्याने वाढली. वीर म्हणून ह्यांची ख्याती झाली. व त्याना रुद्रिय असे नाव प्राप्त झाले.

या कथेचा उद्देश उघड आहे; मरुतांना, पूर्वी, अदितिपुत्र म्हणून वर्णिलेल्या ऋचेतील अभिप्रायाशी ही कथा पूर्ण विसंगत आहे. मरुतांना दितीची मुले म्हणजे दैत्य असे सुचवण्याचा उद्देश येथे उघड आहे. ऋग्वेदात रुद्राला ' असुर हे ' द्व्यर्थी विशेषण लावले आहे. रुद्राला देव न म्हणता "दैत्य" असे म्हणणारा वैष्णवसंप्रदाय आजही आढळतो. यावरून मरुतांना दितीची मुले असे कल्पून तशी कथा निर्माण करण्यात कुणाचा हात असावा हे जाणण्यास विशेष परिश्रमाची गरज नाही.

( iii ) अदितीच्या ' देवमाता ' या स्थानमानाला बाध येऊ नये, याकरता पूर्वी तिच्याशी जोडण्यात आलेले रुद्र-शिवाचे व त्याच्या मुलांचे ( मरुतांचे ) नाते नाकारण्याचे हे प्रयत्न असल्याचे उघड दिसत आहे! आणि ऋग्वेदातील रुद्र-अदिती संबंधाविरुद्ध एक उल्लेख यजुर्वेदात आहे. अदिती ही ' विष्णुपत्नी ' असा तो निर्देश आढळतो ! ' माता रुद्राणां " हा ऋग्वेदकालीन ' समय ' असा बदलतो व " मरुत ही दितीची मुले " असा हा नवा ( संकेत ) "समय रूढ होऊ लागतो !

( iv ) पण ' देवमाता ' अदिती ही शेवटी, एका ' मनुष्य देवाची ' पत्नी होते ! कश्यप नामक नाना चमत्कारसिद्धी असलेला म्हणून विख्यात अशा एका पुरातन, ' दिव्य '–मानवाची पत्नी अदिती अशी एक कथा निर्माण होते! अशा प्रकारे पुराणकथांच्या ओढाताणीत अदिती, शेवटी अदृश्य झाल्याचे दिसते!

कश्यप ही एक मानवव्यक्ति, याचे नाव ऋग्वेदातील (सोम) सूक्तात फक्त एकदाच येते. (IX. ११४.२) अथर्ववेदात, हा चमत्कारसिद्धियुक्त दिव्यपुरुष या भूमिकेवर दिसतो. तपःसामर्थ्याने मानव देव बनतो, अशा श्रद्धेचा एक संप्रदाय भरतखंडात पूर्वीपासून आहे, पण ऋग्वेदाच्या चौकटीत या विचाराला स्पष्ट स्थान नव्हते; तरीही यती-मुनीसंप्रदायाची, ही विचारधारा गुप्तपणे ऋग्वेदातच प्रविष्ट झालेली दिसते; व ( वसिष्ठ- ) वामदेवादींकडून मान्यता पावून स्वीकृत झाल्याचे पुढे दिसून येते. पण ऋग्वेदात मुनिसूक्त येते ( X. १३६ ) यतींचे केवळ उल्लेख आहेत आणि "मनुष्यदेवाः" या संप्रदायाचा उल्लेख ब्राह्मणग्रंथात येतो. शतपथ ब्राह्मणात "पुरुष मेधी" नारायण, पंचरात्र-सत्र यथासांग पूर्ण करून " विराट नारायण " व्हावयाला संसारातून निघाल्याचे वर्णन येते. ऋग्वेदातील दहाव्या मंडळात येणारा ' पूर्वे तपसे निषेदुः ' सप्तऋषींचा उल्लेख सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीने, अत्यंत उपयुक्त, व फार महत्त्वाचा मानावा लागेल. कारण ऋग्वेदात, या विशेष अर्थाची ' तप ' ही धारणा ( concept ) प्रथम इतक्या स्पष्ट स्वरूपात येथेच उघडकीस येत आहे! (१०९.४).

ऋग्वेदातील ' तप ' शब्दाला, भौतस्वरूपाचे अर्थच, बहुतेक ठिकाणी असल्याचे दिसतात. ' तप ' करून परमेष्ठी-प्रजापतित्व, ब्रह्म पदवी, दिव्य दैवतशक्ती प्राप्त करून घेण्याची ही प्रथा सर्वथैव ऋग्वेदा-बाहेरची दिसते. प्रस्तुत " कश्यप " हा या संप्रदायाच्या पूर्वजांपैकीच ( " पूर्वे " ) एक होय. कश्यप हा परमेष्ठी-प्रजापती असल्याचे अथर्ववेद, व ब्राह्मणग्रंथात वर्णन आहे. यादव कृष्ण ' मनुष्यदेव ', याच संप्रदायातला दिसतो.

या मनुष्य-देवांबद्दल निर्माण झालेल्या अद्भुत कथा प्रचलित होतात. कश्यप हा सृष्टिकर्ता असे वर्णन येते ! कश्यप सृष्टीची विवरणात्मक कथा तैत्तिरीय आरण्यकापासूनच प्रचलित आहे. महाभारत, वायु-पुराणादीत कश्यपाचे माहात्म्य ऐकावयास सापडते. कश्यपाकडून झालेल्या सृष्टिनिर्माणकार्यात सहभागी होणाऱ्या त्याच्या पत्नींची नामावळी अभ्यसनीय आहे. काही उदाहरणे पहाः- अदिति, अरिष्टा, दिती, कद्रू, विनिता, इरा, इत्यादि. या नावामध्ये कोणतीही ऐति-हासिक व्यक्ति नाही. सारीच सांकेतिक व्यक्तिनामे ! परंतु या संकेतात्मक रूपकातील स्त्रियांचा "पती" कश्यप हा देवत्व प्राप्त झालेला एक मानव होय. विश्वात देवही आहेत; दैत्यही आहेत; सर्प आहेत; वृक्षवेली आहेत; या उच्चनीच साऱ्याच गोष्टी ( यत् जातं, यत् जनित्वं ) अदितिपासूनच निर्माण झाल्या हे अनेकांच्या भावबुद्धीला पटत नसावे. म्हणून देवासाठी " अदिति " व दैत्यांसाठी " दिती, " सर्पांसाठी " कद्रू " ... याप्रमाणे प्रत्येक वर्गाच्या प्राणिमात्रांसाठी तदनुषंगिक गुणस्वभावाच्या वेगवेगळ्या माता निर्मिल्याचे दिसते.

परंतु कश्यपाची " पत्नि " म्हणून ज्यांना ज्यांना म्हटले, त्या सर्वजणींचा, ' अ–खंडिता, ' समग्रा ' ' अदितीमध्ये ( undifferentiated whole ) समावेश होतोच. पण तिला फक्त ' देवमाता ' म्हटल्यावर ' दिती ' इत्यादि दुसऱ्या मातांची गरज निर्माण होते. अदितीचे आदिदर्शन ( Gestatt ) म्हणजे कोणत्या प्रकारचे ? हे कश्यपाच्या पत्नी गणल्या गेलेल्या " अदिती "च्या सवतींच्या, ( स–पत्नींच्या ) नावावरून स्पष्ट होत आहे. मूळ एकाच, सम्यक् दर्शनामधील एकेक भाग, नंतरच्या विशेष परिचयात स्पष्ट होऊ लागतो; व मूळ स्थूल दर्शनातील विचाराचा विकास होण्याची ही रीत कश्यपपत्नींच्या नामावळीतून चांगल्या प्रकारे निदर्शनास येते.

अशी ही विचार–विकासक्रम सूचक गोष्ट निघाल्या-मुळे, या संदर्भात आणखी एक कथा उद्बोधक होणार आहे. यादववंशी कृष्ण, ही एक मानवव्यक्ति, पण हा मानव, आपल्या माहात्म्याने एक अवतारी पुरुष बनतो. हा कृष्ण मनुष्यदेव नव्हे; देवच मानव झाला म्हणून समजण्यामागील प्राचीन परंपरेची खात्री पटण्यासाठी, तत्पूर्वकालीन, कश्यपाची ही कथा, फारच उपयुक्त आहे. पण एकेकाळी परमेष्ठी–प्रजापती गणला गेलेला कश्यप, आज दृष्टीआड झालेला असून, श्रीकृष्ण यादव मात्र, भगवंताच्या रूपात नित्य प्रातःस्मरणीय वंद्य पुरुषोत्तम होऊन, आपले अमरत्व सिद्ध करीत आहे. कश्यप व कृष्ण यांच्यातील या तफावतीचे कारण काय ?

विचार व भावनांच्या अभिव्यक्तितील समय–सौंदर्य-युक्त प्रतिमासंकेत हे काळ बदलू लागताच काही देवताप्रतिमा ( संकेत ) मागे पडतात; तर त्या पूजा-स्थानी नव्या प्रतिमा ( संकेत ) आलेल्या दिसतात. याचे कारण काय ? जुन्या संकेतांती अर्थ विरून जातो; किंवा ते संकेत, नव्या अभिरुचीस विसंगत वाटू लाग-तात. "गूळ्हं गभीरं " अशा–नितांत रमणीय, उदात्त, दिव्यभव्य अशा आनंदानुभूतीच्या संस्पर्शनाची मूर्तिमंत स्मृतीच होय. देवताप्रतिमात याचा बराच प्रत्यय येतो. अशा देवता-प्रतिमा लोकाना जास्त आत्मीय वाटणे साहजिक आहे. कश्यपाची प्रतिमा ( संकेत ) संपूर्णपणे प्राथमिक स्वरूपाची आहे. हे प्राथमिक स्वरूप अजून टिकून आहे, ही एक उपकारक गोष्टच म्हणावयाची ! भारतीय मनुष्य-देवसंप्रदायातील विचार-विकासक्रमाचे टप्पे यामुळे निश्चितपणे लक्षात येणे शक्य होत आहे. कश्यपाने वृत्रहननासाठी इंद्राला एक मंतरलेला ताईत दिला म्हणे ! हरि–हर ब्रह्मादि देवतांचा पिता सुद्धा हा कश्यपच ! असे ही कथा सांगते. आदिमाताः अतिमानुष दिव्य शक्ती गणलेली अशी " अदिति " ही मानव ( देवाची ) पत्नि म्हणे ! अशा थाटाच्या अद्भुत चमत्कारसिद्धीच्या कथांवर श्रद्धेने विश्वास ठेवणारे लोक एके काळी होते. पुढे किंचित् काळ

बदलतो. व्यासनिर्मित 'कृष्ण'ची प्रतिमा कश्यपाहून निराळी बनते ! व्यासांनी निर्मिलेली श्रीकृष्णप्रतिमा किती विशाल, भव्य, उदात्त सौंदर्ययुक्त आहे ? ती सुविचारघन आहे; ती गूढही पण आहे. या कृष्णाच्या विविध भूमिकांतील प्रतिमांनी, ( भरतखंडाबाहेरही ) संपादिलेले विश्वप्रेम, याची साक्ष पटवीत आहे. व्यासकृत कृष्णप्रतिमेने, भारताबाहेरील कित्येक भावुक विचारवंतांना भारून टाकले आहे. मनुष्य-देव कृष्णाच्या या प्रतिमेच्या तुलनेने, महासिद्ध कश्यपाच्या प्रतिमानिर्माणातील प्राथमिकता,-बोंगळपणा विशेषत्वाने उठून दिसतो.

परंतु अधिक प्रसंगी भक्तवर्गाच्या कचाट्यातून श्रीकृष्णाची प्रतिमाही संपूर्णतया मुक्त आहे असे म्हणता येत नाही. तरीही श्रीकृष्णाला अदिति, अरिष्टा, दिती वगैरे सारख्या स्त्रिया होत्या असे सांगण्याचा मोह, या श्रीकृष्णभक्तांना झाला नाही, हे त्या श्रीकृष्णाचे भाग्यच म्हणावयाचे ! विष्णुपत्नी म्हणून गणली गेलेली श्रीलक्ष्मी हीच साक्षात् (विष्णूचा अवतार म्हणवलेल्या) श्रीकृष्णाची पत्नी म्हणता आले असते; पण त्या जागी रुक्मिणीनामक मानवव्यक्तीच कल्पिली आहे. तरीपण श्रीकृष्णाने, "विवस्वानाला" ( सूर्यदेवाला ) उपदेश केला ही गीतेची अत्युक्ति कश्यपचरित्रातील चमत्कारांच्या जोडीचीच आहे. तरीसुद्धा, लोकप्रिय श्रीकृष्ण-कथात, "भगवान् श्रीकृष्णापासून ब्रह्ममहेश्वरादींचा जन्म झाला," अशा प्रकारच्या एकदम हास्यास्पद वाटणाऱ्या कथा न रचण्याचा संयम दिसत आहे हे अभिनंदनीय आहे. खास हे 'न मेधया' संप्रदायात मेधा सर्वथैव नष्ट न झाल्याचे सूचक असे म्हणावेसे वाटते. देवताकथांची तुलनात्मक समीक्षा म्हणजे मानव-प्रज्ञा व विचार-भावना यांचा उद्गमविकास, व त्याच्या वैचारिक क्षेत्रातील वाटचालीचे सिंहावलोकनच होय.

देवि अदिति-अंभृणींच्या समालोचक ध्यानामध्ये लक्षांत आलेल्या गोष्टींचा, पडताळा पाहण्यास व जास्त सखोल अभ्यास होण्यास आणखी एक देवी : सरस्वती, हिच्या स्तोत्रामधून उपलब्ध होणाऱ्या प्रकाशाचा लाभ घेणे उपयुक्तच ठरेल.

---










प्रा. गो. म. कुलकर्णी

# मराठीतील दीर्घ कविता : एक चिंतन

मराठी संतकवींनी विपुल प्रमाणात दीर्घ कवितालेखन केले असूनही दीर्घ कविता म्हटली की, हटकून आठवण येते ती पंडित कवींची; कारण संतकवींनी दीर्घ कविते इतकेच स्फुट काव्यही लिहिले आहे. शिवाय संतकवींचे दीर्घ काव्य [ 'विवेकसिंधु' 'ज्ञानेश्वरी' 'एकनाथी भागवत' 'दासबोध' इ. ] भाष्यकारांच्या भूमिकेतून स्फुरलेले आहे तर पंडित कवींचे या प्रकारचे लेखन हौसेतून, क्रीडावृत्तीतून अधिक प्रमाणात निर्माण झालेले आहे. याला 'कलाकाव्य' अशी पदवी कोणी कोणी देतात ती यासाठीच.

## कारागिरीप्रधान कविता

आपल्या आवडीनिवडीप्रमाणे पुराणातील एखादा कथाखंड निवडावा, तो रसालंकारांनी मंडित करावा, त्यावर विविध वर्णनांचा साज चढवावा, त्यात स्वकालाला उपयुक्त ठरणारा उपदेश पेरावा, स्वतःच्या चमत्कृतिपूर्ण रचनालाघवाचे दर्शन घडवावे, विदग्ध संस्कृत साहित्यकाराशी कौतुकाने स्पर्धा करण्याचा प्रयत्न करावा, किंवा त्यांचे अनुकरण करावे[१] ही या कवींची आंतरिक मनीषा. ती पुरी करण्यासाठी त्यांनी 'कौशल्य सारे रचनेत आहे' या तत्त्वाची कास विशेषेकरून धरली. परिणामतः हे लेखन कारागिरीप्रधान झाले. परंतु याबद्दल खंत बाळगण्याचे या कवींना काही कारण नव्हते. या काळातील काव्यविषयक कल्पनाच बऱ्याचशा प्रमाणात कारागिरीप्रवण होत्या. तत्कालीन धर्मव्यवहारातील तांत्रिकताप्राधान्याची, कर्मकांडाभिमुखतेची ही कदाचित् वाङ्मयीन फलश्रुती असावी. कारागिरीबद्दलचा विलक्षण उत्साह हीच या प्रकारच्या निर्मितीमागील प्रमुख प्रेरणा ठरली ती यामुळेच :

'छंदज्ञाननिघंटनाटकरसालंकारकाव्यक्रिया
जो जाणे गुरुदेवतावरकृपा सारस्वतप्रक्रिया
त्याचें शुद्ध कवित्व मान्य चतुरांमध्ये सभामंडळी'

—हा विठ्ठल कवीचा आदेश या प्रेरणेतूनच स्फुरलेला.

या कारागिरीप्रवण 'सारस्वतप्रक्रिये'चेही वाङ्मयीन व्यवहारात एक महत्त्वाचे कार्य असते. वाङ्मयासंबंधीचे प्रेम वा निष्ठा जिवंत ठेवण्यास, वाङ्मयविषयक कुतूहल जागृत करण्यास, विशिष्ट वाङ्मयीन वातावरण वा परंपरा यांचे संवर्धन करण्यास, ही प्रक्रिया अनेकदा उपयोगी पडते. ती निर्मात्याच्या व आस्वादकाच्या परिश्रमशीलतेला, पांडित्याला सतत आवाहन करिते. ज्या काळात हे साहित्य निर्माण झाले त्या काळात तर होतकरू विद्यार्थ्यांना वाङ्मयाचे पाठ देण्याचे हे हुकमी साधन मानले जाई. विदग्ध संस्कृत साहित्याच्या वाचनातही रसिकतासंवर्धनापेक्षा या भाषाशिक्षणाच्या भूमिकेलाच प्राधान्य होते. पंडिती कवितेतील समासप्राचुर्य, अपरिचित शब्दयोजना, वृत्तवैचित्र्य, चित्रबंध इत्यादी घटकांचे, तीतील गौडीरीतीचे, एकेकाळी अमाप कौतुक का झाले, याची संगती या भूमिकेच्या अनुरोधाने लावता येते.

अशा प्रकारे ही काव्यपद्धती एकेकाळी वाङ्मयशिक्षकांना, चमत्कृतिप्रिय व्यक्तींना वा कीर्तनसंस्थेसारख्या संस्थांना स्वागतार्ह वाटली तरी चोखंदळ रसिकांच्या मान्यतेचे भाग्य तिच्या वाट्याला फारसे आले नाही. आजच्या काळातील बदललेल्या अभिरुचीच्या रसिकाची बाब तर सोडाच पण जुन्या पठडीतील रसिकांनाही ही कविता संत वा शाहिरी काव्याइतकी तोषप्रद वाटलेली नाही. त्यांना तीत संतसाहित्याचे अलौकिक तेज आढळत नाही किंवा शाहिरी साहित्यातील रंगत दिसत नाही. मधल्या क्रमाच्या वाट्याला येणाऱ्या साऱ्या उपेक्षेची मात्र ती धनीण झाली आहे. याला अर्थात् ही रचनापद्धतीच फार मोठ्या प्रमाणात जबाबदार आहे. तिच्यात संतसाहित्य, विदग्ध संस्कृत काव्य, व लोकवाङ्मय यांची जी गल्लत झालेली आहे तिने तिच्या अस्मितेवरच आघात केलेला आहे. कोणत्याही एका पातळीच्या अभिरुचीचे संतर्पण करण्यास ती यामुळे अक्षम ठरली आहे.

---

१. 'व्यासग्रंथगिरीचें सोनें । संस्कृत खोटिये गाळूनि यत्नें ।
देशभाषा घडिलें लेणें । साहित्यरत्नीं सुजडित' – मुक्तेश्वर








या दुरवस्थेला हे साहित्य ज्या काळात व ज्या परिस्थितीत निर्माण झाले तो काळ, ती परिस्थिती आणि संस्कृती काही अंशी कारणीभूत आहे. साऱ्याच जुन्या कवितेवर आशयाचे एक विशिष्ट बंधन होते, पण विषयनिवडीच्या बाबतीत संस्कृत साहित्याच्या मानाने ही कविता अधिक अडचणीत सापडलेली दिसते. संस्कृत साहित्यकारांवर जी बंधने होती ती विशिष्ट साहित्यशास्त्राच्या अनुसरणापुरतीच मर्यादित होती. लौकिक विषयांचे संस्कृत कवितेला वावडे नव्हते. पण या बाबतीत पंडिती कवितेच्या कक्षा संत-परंपरेच्या दडपणामुळे अधिकच अरुंद झालेल्या दिसतात.

संस्कृत साहित्यकारांना काव्याइतकेच किंबहुना त्याहूनही अधिक प्रभावी असे नाटकाचे माध्यम आविष्कारासाठी उपलब्ध होते, मराठी कवींच्या बाबतीत, अनेक कारणांनी हे माध्यम वर्ज्य ठरलेले होते. या कवींचा वाचकवर्गही धड विदग्ध ना अविदग्ध असा;[२] या साऱ्या परिस्थितीत पंडित कवींची निर्मिती फार वरच्या दर्जाची होऊ शकली नाही, यात नवल नाही. या साऱ्या परिस्थितीवर मात करणारा प्रतिभावंत या कवितेच्या वाट्याला येऊ शकला नाही, (किंवा येऊनही त्याचे प्रयत्न अपुरे राहिले) हे या कवितेचे सर्वात मोठे दुर्भाग्य !

या पंडित कवीत विशेष मान्यतेला चढलेले कवि म्हणजे नरेंद्र, भास्कर, मुक्तेश्वर, वामन, रघुनाथ आणि मोरोपंत यापैकी नरेंद्र आणि रघुनाथ यांचे प्रयत्न त्रुटित स्वरूपात आढळणारे, भास्कर आणि वामन 'निवृत्तिया जोगा' ग्रंथ लिहिण्याच्या मागे लागलेले, मुक्तेश्वराचे सामर्थ्य मोठे पण ते त्याच्याच चांचल्याने विकीर्ण झालेले; राहता राहिले मोरोपंत; दीर्घकाव्यलेखनाला लागणारे सातत्य, साक्षेप, योजनात्मकता, परिश्रमशीलता, वैदग्ध्य, रचनाप्रभुत्व इत्यादी गुण मोरोपंतांजवळ पुष्कळ प्रमाणात होते. या गुणांचा परिपाक त्यांच्या 'केकावली'सारख्या काव्यात आढळतोही. परंतु पंतांच्या कवितेत शिरलेल्या इतर अनेक वैगुण्यामुळे त्यांची कविता तेवढी प्रभावशाली ठरू शकली नाही.

## दीर्घ कविता – कविमनाचा एक ध्यास

मोरोपंतानंतरच्या काळात दीर्घकाव्य लेखनाची ही परंपरा अव्वल इंग्रजीतील शास्त्री-पंडितांनी पुढे चालविली. (तिचेच अवशेष अलीकडच्या काळातील साधुदास, वि. वा. भिडे, इत्यादींच्या रचनेत आढळतात.) परंतु अव्वल इंग्रजीतील साऱ्याच प्रेरणा परप्रत्ययनेय होत्या, त्याला ही कविताही अपवाद नव्हती. इंग्रजी राजवटीतून निर्माण झालेले नवे संस्कार आत्मसात केलेल्या डॉ. कीर्तिकर, कुंटे, कानिटकर प्रभृतींनी दीर्घ कवितेच्या जुन्या गिरमिटातून नवे वळसे घेण्याचा प्रयत्न केला. पण या प्रयत्नाला बाळसे येण्यापूर्वीच या वाङ्मयप्रकाराला व्यापून पुढे जाणारा कादंबरीसारखा प्रकार अवतीर्ण झाला आणि काव्याचे क्षेत्र भावगीतापुरतेच मर्यादित झाले. भावगीत लेखनासारखा आत्मनिष्ठ प्रकार व्यक्तिस्वातंत्र्याच्या वाढत्या विचाराला पोषकच असल्याने, खरे काव्य हे भावगीतात्मकच असते; असे मग त्याचे तात्त्विक समर्थनही केले जाऊ लागले, आणि यातूनच पुढे आधुनिक काळात महाकाव्य निर्माण होणे अशक्य असल्याचा ध्वनि उमटला.

आधुनिक कविता भावगीतप्रधान असली व रसिकांनी आणि टीकाकारांनी दीर्घ कवितेकडे काहीशा उपेक्षा दृष्टीने पाहिले असले तरी प्रदीर्घ काव्य लिहिण्याची महत्त्वाकांक्षा अनेक आधुनिक कवींच्या मनात घर करून होती, ही वस्तुस्थिती आहे. संकल्पाप्रमाणे आपल्या हातून दीर्घ काव्य लिहून होत नसल्याची खंत खुद्द केशवसुतांनीच व्यक्त केली आहे, त्यांचे 'I am a dwarf' सारखे तीव्र उद्गार याच खंतीचे

---

२. पंडित कवींनी आपली कविता नेमकी कोणाकरिता लिहिली, याचा नीट अंदाज लागत नाही. ती 'स्वान्तसुखाय' नव्हती हे उघड आहे. विद्वानांच्या परितोषाची भाषा ती पुष्कळदा बोलते, पण त्यांचा परितोषही ती थेटपणे साधण्याचा प्रयत्न करीत नाही. विद्वत्तेचा डौल मिरविणाऱ्या विठ्ठल–नागेशांचे आश्रयदाते विदग्ध वृत्तीचे असल्याचे दिसत नाही. मोरोपंतांच्या आश्रयदात्यांचा; बारामतीकरांचा विचारही विद्वान म्हणून करणे अप्रस्तुतच ठरणार : सामान्यांना पुराणकथेचा परिचय करून देण्यासाठी हे साहित्य निर्माण झाले असे म्हणावे तर त्याचा एकूण रचनाबंध सामान्यांच्या आवाक्याबाहेरचा आहे.

निदर्शक; केशवसुतानंतर उदयास आलेल्या गोविंदाग्रज आणि बालकवी या प्रसिद्ध कविद्वयांच्या मनातही दीर्घ काव्य लिहिण्याचा विचार घोळत होताच. रे. टिळक, विनायक, बी, चंद्रशेखर, सावरकर, रेंदाळकर या कवींची प्रसिद्धी तर भावगीतरचनेपेक्षा दीर्घकाव्य लेखनावरच अधिक अवलंबून आहे. माधव जूलियन्, यशवंत, गिरीश या रविकिरणमंडळाच्या तीनही प्रमुख कवींनी स्फुट काव्यलेखनाइतकेच दीर्घकाव्यलेखनही केले आहे. माधव जूलियन् आणि यशवंत यांनी तर भावगीत आणि खंडकाव्य यांची वेगळी युती साधण्याचा उपक्रम अनुक्रमे 'तुटलेले दुवे' आणि 'जयमंगला' या काव्यातून केला. रविकिरण मंडळाला समकालीन असलेल्या अनिलांची या क्षेत्रातील कामगिरी सुपरिचितच आहे. रविकिरणमंडळानंतरच्या पिढीतील बोरकरांसारख्या कवींनीही 'महात्मायन' नांवाचे महाकाव्य लिहिण्याचा विचार कितीतरी कालापूर्वी प्रकट केला आहे.

आणि 'त्रुटित जीवनातील सुट्या कल्पनां'ची गुंफण करणाऱ्या मर्ढेकरांसारख्या नवकवीने महाकाव्य लिहिले नसले तरी महाकाव्याबद्दल उत्कट आदरभाव दाखविला आहे. ['सौंदर्य आणि साहित्य' प्रथमावृत्ति, पृ. १९५]. कुणी सांगावे? मर्ढेकर दीर्घायुषी होते तर त्यांनी दीर्घकाव्य लिहिलेही असते. तात्पर्य, केशवसुतांपासून मर्ढेकरांपर्यंतच्या काळात चांगले दीर्घकाव्य लिहिले गेले असो-नसो, दीर्घकवितेची ओढ कविमनात सातत्याने आढळते. कविमनाचा हा एक शाश्वत ध्यास आहे असे दिसते. या ध्यासातूनच गेल्या शंभर वर्षात सुमारे दोनशेपर्यंत खंडकाव्ये लिहिली गेली.[३]

**आत्मनिष्ठेचे पाठबळ दीर्घकवितेलाही अवश्य**

भावगीतप्रधान अशा या कालखंडांतील ही दीर्घकाव्यनिर्मितीची संख्या उपेक्षणीय नाही. या निर्मितीचा तपशिलात जाऊन विचार करताना मात्र फारच थोडे लक्षणीय असे हाती लागते. या लक्षणीयात माधव जूलियन् आणि अनिल यांच्याच दीर्घकाव्य निर्मितीचा प्रामुख्याने अंतर्भाव होतो. अव्वल इंग्रजीतील कुंटे यांचा उपक्रम वगळता याच दोघांनी या प्रकाराला वेगळे वळण लावण्याचा साक्षेपी प्रयत्न केला. अनिलांच्या 'भग्नमूर्ती'त व माधव जूलियन् यांच्या 'सुधारक' व 'विरहतरंग' या खंडकाव्यातून याची चांगलीच प्रतीती येते. अनिलांचे 'भग्नमूर्ती'च्या परिशिष्टातील तात्त्विक विचार खंडकाव्यरचनेला नवी दिशा देण्याच्या दृष्टीने मोलाचे आहेत. 'भग्नमूर्ति' हा खंडकाव्याच्या विकासक्रमातील एक महत्त्वाचा टप्पा.

परंतु गंमत अशी की, माधव जूलियन यांनी या प्रकाराचा अनिलाइतका तात्त्विक विचार केलेला नसूनही त्यांची या क्षेत्रातील निर्मिती अनिलांच्या निर्मितीहून अधिक सरस वाटते. वस्तुतः परिश्रमशीलता, काव्यविषयक निष्ठा, रचनासाक्षेप, वैदग्ध्य इत्यादी बाबतीत हे दोनही कवी सारख्याच तोलाचे; तसे पाहिल्यास विचारांचा व्यापकपणा व रसिकतेचा चोखडपणा माधव जूलियन् यांच्या मानाने अनिलातच अधिक आढळणारा; अनिलांच्या तुलनेने माधव जूलियन् यांचे व्यक्तित्व कितीतरी एकारलेले; परंतु माधव जूलियन यांचे हे एकारलेपणच, आत्मप्रतीतिदृष्ट्या, त्यांच्या या निर्मितीला पूरक झाले आहे. 'विरहतरंग' किंवा 'सुधारक' यात आढळणारे हे आत्मप्रतीतीचे बळ अनिलांच्या 'भग्नमूर्ति' 'प्रेम आणि जीवन' 'निर्वासित चिनी मुलास' यात नाही. अनिलांची ही रचना वाजवीहून अधिक वस्तुनिष्ठ वाटते. भावगीताच्या मानाने दीर्घ कवितेला व्यापक वस्तुनिष्ठेचे अधिष्ठान आवश्यक असले तरी या वस्तुनिष्ठेला सातत्याने उत्कटतेत पर्यवसित करणाऱ्या आत्मनिष्ठेचे पाठबळ मिळणे अत्यावश्यक असते. पर्यायाने वस्तुनिष्ठ दीर्घ कवितेतही शेवटी महत्त्व येते ते आत्मप्रतीतीलाच. याच्या अभावामुळेच महाकाव्यलेखनाचे प्रचंड सामर्थ्य असलेल्या सावरकरांची दीर्घकविता त्यांच्या गद्या इतकीही रसरशीत वाटत नाही. सावरकरांच्या दिव्यदाहक व्यक्तित्वाची दीप्ती त्यांच्या दीर्घरचनेत क्वचितच अवतरते.

याचाच अर्थ, दीर्घकवितेचे यश केवळ रचनाप्रभुत्वावर, आशयघनतेवर, बाह्य विचारानुभवावर किंवा व्यक्तित्वावरही अवलंबून नाही. या साऱ्यांच्या मागे किंवा जोडीला असलेली आणि काव्यगत झालेली

३. डॉ. ह. कि. तोडमल 'अर्वाचीन मराठीतील खंडकाव्ये' पृ. ४६३-४६८.

प्रतीतीची प्रखरताच अधिक महत्त्वाची; विचारानुभवांचे क्षेत्र मर्यादित असूनही माधव जूलियन् यांना यामुळेच खंडकाव्यलेखनात इतर कोणाहीपेक्षा अधिक यश मिळाले; केवळ उघडयाबागडया आत्माविष्काराने हे यश कसे डागळले जाते हेही माधव जूलियन् यांच्याच 'नकुलालंकार' काव्यावरून स्पष्ट होते. म्हणूनच माधव जूलियन् यांच्या यशस्वी दीर्घकाव्यांचा विचार करताना 'विरहतरंग' व 'सुधारक' या दोनच काव्यांचा उल्लेख करावा लागतो. 'विरहतरंगा'वर थोडी सांकेतिकतेची छाया आहे; आशय-अभिव्यक्तीच्या ताजेपणामुळे व कवीच्या व्यक्तित्वाला पूर्ण अवसर मिळण्याच्या दृष्टीने त्यांचे 'सुधारक' हे खंडकाव्यच अधिक संस्मरणीय.

परंतु माधव जूलियन् यांचे हे खंडकाव्य आपल्या परीने कितीही चांगले असले तरी त्याने श्रेष्ठ दीर्घकाव्याची तहान शमत नाही. श्रेष्ठ दीर्घकाव्यात अपेक्षित असलेली चिंतनशीलता, उत्कटता, उदात्तता, गूढता, 'सुधारक' सारख्या उपहासप्रचुर काव्यातून अपेक्षिणेच व्यर्थ; यासाठी वेगळ्या दीर्घकाव्याची प्रतीक्षा करणे प्राप्त आहे.

चांगल्या दीर्घकाव्यातील काही गुणांचा आढळ अलीकडच्या कादंबरीतून क्वचित होतो. मागच्या एका काळात मराठी कादंबरीने दीर्घकवितेपासून आपली फारकत करून घेतली असली तरी आजची कादंबरी कवितेशी जवळीक करू इच्छिते; यामुळे भावी काळात या दोन वाङ्मयप्रकारातील अंतर कमी होण्याची शक्यता आहे; पण ही शक्यता गृहीत धरूनही नवी कादंबरी दीर्घकवितेची जागा पूर्णतया घेऊ शकेल, असे वाटत नाही. कारण या दोन्ही माध्यमांच्या प्रेरणाच मूलतः भिन्न आहेत. कादंबरी कितीही काव्यात्म पातळीवर गेली तरी तिला गद्यात्मतेचा आश्रय सोडणे अशक्य; आणि दीर्घकवीतेने काही वेळा गद्यात्मतेला अपरिहार्यपणे स्पर्श केला तरी तिला आपल्या काव्यात्म प्रकृतीचा विसर फार वेळ पडणे अनिष्ट.

मराठीतील दीर्घकवितेला हा असा विसर अनेकदा पडतो, हेच तर या बाबतीतील खरे दुःख आहे. तिला हा असा स्व-प्रकृतीचा विसर पडण्यास, तिची पातळी एकसंधपणे काव्यात्म न राहण्यास आजच्या जीवनातील अस्थिरता, अश्रद्धा, विफलता इत्यादी घटकही काही अंशी कारणीभूत आहेत. आजच्या इतकी रसविघ्ने जुन्या काळात नव्हती. या दृष्टीने जुना काळ दीर्घकाव्य लेखनाला अधिक अनुकूल होता असे म्हणावे लागते. परंतु त्या काळातही चांगली दीर्घकविता निर्माण होऊ शकली नाही. ती का होऊ शकली नाही; याचा विचार करताना मागे विशिष्ट परिस्थितीचाच उल्लेख करावा लागला. येथेही पुन्हा परिस्थितीचाच पाढा वाचावा लागतो. स्फुट कवितेच्या मानाने दीर्घकाव्य हे अधिक परिस्थितिसापेक्ष असते, हाच याचा अर्थ.

## दीर्घ कवितानिर्मितीसाठी अनुकूल वातारवण निर्माण व्हावे

प्रतिकूल परिस्थितीची ही बाब लक्षात घेत असताच, या प्रतिकूल परिस्थितीचे आव्हान पत्करणारा, किंवा युरोपखंडातील काही आधुनिक कवींप्रमाणे या प्रतिकूल परिस्थितीलाच दीर्घकवितेचा विषय बनविणारा धुरंधर कवी का पुढे येऊ नये ? असाही विचार मनात येतो. मागच्या कवीप्रमाणेच आजच्याही कवीची कोंडी परिस्थितीने केली असेल, अधिक तीव्रपणानेही; परंतु ही अशी कोंडी कमी जास्त प्रमाणात कोणत्याही काळात होतच असते. मागच्या कवीच्या मानाने आजचा कवी अधिक आत्मजागृत व स्वतंत्र असल्याने ही कोंडी फोडण्यास तो पूर्वकवींपेक्षा अधिक उत्सुक असावयास हवा : दीर्घकवितेच्या उणिवेची बोच त्याला अधिक झेबावयास पाहिजे. आजच्या कवीला या वैगुण्याची जाणीव येत असल्याची लक्षणे दिसू लागली आहेत.[४] दीर्घकवितेच्या भावी विकासाच्या दृष्टीने हे एक सुचिन्हच मानावयास हवे.

या चिन्हातून डोकावणारा भावी फलप्राप्तीचा आशांकुर वाढीस लागण्यास होईल तितके अनुकूल वातावरणही निर्माण करणे आवश्यक आहे. कोणतीही प्रभावशाली प्रेरणा प्रतिकूलतेचे कवच फोडून बाहेर

---

४. "...... सर्व प्रवृत्तींचे व शैल्यांचे संश्लेषण साधून दशांगुळे उरणारी प्रगाढ प्रतिभाशक्ति निदान अजून तरी या युगाला भेटलेली नाही. साराश या युगाला अजून युगकवीच मिळालेला नाही."
– गो. वि. करंदीकर 'मर्ढेकराची कविता' 'मौज' दिवाळी अंक १९६५








येते, हे खरे असले तरी अनुकूल वातावरणाने तिचे भरणपोषण त्वरेने होते, हे खोटे नव्हे.

नव्या दीर्घकवितेच्या स्वागतासाठी अनुकूल वातावरण निर्माण होण्याच्या दृष्टीने; कविता म्हणजे भावगीत, कविता म्हणजे केवळ प्रबल भावनेचा सहजोद्रेक, वगैरे सारखे कवितेसंबंधीचे एकांगी समज मावळावयास पाहिजेत. प्रबळ भावनोर्मींना अंकित करून दीर्घ साधनेने विचार-भाव- कल्पनांचे एक वेगळ्या परिमाणाचे काव्य निर्माण होणे शक्य असते; त्याचे काही वेगळे सौंदर्य व सामर्थ्य असते; हा विचार नव्याने रूढ व्हावयास पाहिजे. दीर्घ कवितेसंबंधीचे किंवा एकंदर कवितेसंबंधीचेच प्राथमिक स्वरूपाचे जे गैरसमज अलीकडच्या काळात रूढ झाले आहेत, त्यांचे निर्मूलन होणे अगत्याचे आहे. अनेक संस्कारांनी समृद्ध झालेली, पूर्वग्रहविरहित अशा प्रगल्भ मन-बुद्धीलाच महाकाव्याचा खरा आस्वाद घेणे शक्य असते.

आणि अशा सर्जनास पर्युत्सुक झालेले कविमन तर अतिशय समृद्ध, प्रौढ, चिंतनप्रवण असे असावयास पाहिजे. व्यापक आणि उत्कट चिंतनशीलता हा या सर्जनाचा पाया; यातूनच वेगवेगळ्या भावनांचा, कल्पनांचा, विचारांचा संकुल आणि संपन्न कल्प जन्म घेतो. एका स्पंदनातून दुसरा स्पंद उमलून उठतो. ही असली स्पंदने सचेतन होण्यास युगायुगांचे पूर्वसंचित असलेली पुराणकथा ( Myth ) अधिक अनुकूल ठरत असावी; पूर्वसूरींनी पुराणकथांचा जो आश्रय केला आणि ' म्हणोनि जे भारती नाही । ते नोहे लोकी तिही ' अशी जी ग्वाही दिली ती यासाठीच Myth च हे भांडार कधी न संपणारे, कविप्रतिभेला सतत आवाहन करणारे, आव्हान देणारे असे असते. या भांडाराचा जेवढा आणि जसा उपयोग नवकवी-कडून व्हावयास पाहिजे तसा तो अद्यापि तरी झालेला नाही.

पुराणकथांचा वापर केला जावो वा न जावो; निसर्ग आणि मानव, जन्म आणि मरण, प्रयत्न आणि प्रारब्ध यांच्या ज्या चक्री वादळांनी हे जीवन भरलेले आहे, त्या वादळाची चमत्कृतिपूर्ण स्थितिगती हा मानवी चिंतनाचा सनातन विषय आहे. या विषयाचे आवाहन ज्या वेळी कविमनाला पोचेल, त्याच्या चित्तवृत्तीचा स्थंडिल प्रज्वलित करील, त्याचवेळी या प्रकारच्या वाग्यज्ञाची सिद्धता झाली असे म्हणता येईल.

या वाग्यज्ञात स्वतःसकट साऱ्या पूर्वकल्पनांचे हवन करण्यास जो सिद्ध होईल, त्याच्याच वैखरीला महाकाव्यसर्जनाचे पसायदान लाभेल.

तोच आमचा उद्याचा वाग्गेयकार.

---





अनुक्रमणिका

प्रा. एस्. एस्. भोसले

# केशवसुतांच्या कवितेचा जन्महेतू : (पूर्वार्ध)

केशवसुतांच्या कवितेचा जन्महेतू कोणता या प्रश्नाचे उत्तर शोधताना अच्युतराव कोल्हटकर-वर्डस्वर्थ यांचे एक समानार्थी संकलित विधान— "उत्कट मनोवृत्तींचा-भावनांचा खळाळीसारखा: अनायासे बाहेर पडणारा शब्दांचा महापूर म्हणजे काव्य"—मनात घर करते. केशवसुतांच्या संख्येने त्रुटित पण गुणांनी बहुमोली उत्कट कवितेने ते सार्थतेने धरून ठेवले आहे. किंबहुना केशवसुतांच्या बहुतेक साऱ्या कवितेचे स्वरूपच मुळी वादळी, खळाळी आहे. पण भावना, कल्पना आणि विचाराचे स्फुरण यांचा त्यात समतोल असल्याने ते अनेकरंगी गंधाच्या झळाळीने माखून गेले आहे.

केशवसुतांच्या प्रतिभेच्या या सहजनर्तनात त्यांच्या कवितेच्या जन्महेतूसंबंधी पृच्छा करतो तेव्हा "काव्यं यशसे अर्थकृते व्यवहारविदे" ही मम्मटाची व्याख्या गृहीत धरून चालत नाही. किंबहुना असल्या प्रयोजन-प्रकल्पातील पारंपरिक प्रयोजनांवर केशवसुतांनी विश्वास ठेवलेला नाही. रूढ अर्थाने त्यांचे तिकडे ध्यानही नाही. त्यामुळे केशवसुतांच्या संकलित कवितेचा चेहरामोहरा, त्याची दिशा व त्या दिशेतून मिळणारा पायरव घेण्याने आपला जन्महेतूचा प्रवास सोपा बनण्यास साहाय्य मिळते.

केशवसुतांच्या कवितेच्या एकूण प्रवासातून कोणता पायरव मिळतो ? केशवसुत मास्तर होते : उत्कृष्ट शिकविणे आणि असे शिकवणे मिळणार नाही अशी चारचौघात ख्याती असणे हे त्याकाळच्या मास्तराचे वैशिष्टय. कशातरी मिळणाऱ्या, घाम गा गाळून पोट जाळण्यासही पुरेशा न पडणाऱ्या तुटपुंज्या चार दिडक्याहून परम संतृप्तीचेच नव्हे तर ब्रह्मानंदसहोदरा-इतके ते अवीट होते. केशवसुत असे कौतुकाचे समाधान घेणारे होते की नाही हा प्रश्न वगळला तरी त्याहून ते वेगळे होते. नुसते मास्तर नव्हते. पेशाने मास्तर असले तरी दृष्टीकोनाने, विचार-संवेदनेने मास्तर नव्हते. कवीमास्तर होते, त्यांचा मुळचा पिंड कवि-प्रकृतीचा आहे. तोही नित्याच्या मास्तराचा नाही, त्याहून अधिकाचा आहे. सर्वसामान्य मास्तर कौतुकाचे समाधान परम संतृप्तीचे मानतो. पोरवडयात आणि घरच्या इकडल्यातिकडल्या मेणचटलेल्या मंडळीत गुंग असतो. अंगावर येईल तेवढेच अंगावर घेतो किंबहुना तसले काही अंगावर पडूच नये म्हणून खपणे असे चालते. त्यापलीकडचे पाहायचे, वाचायचे (लिहायचे सोडून द्यायचे. तो काळच शब्दापेक्षा कृती महत्त्वाची मानणारा होता.) दूर होते. जिज्ञासा असली तरी धडक नव्हती. नेमेचि जगणे होते. चोहो-बाजूनी डोळ्यावर आलेल्या झापडांनी विशालतेने काही आकळावे आणि व्यापकतेने काही ढवळून काढावे असे मनात क्वचितच यावे. साहजिकच जीवनाची सारी दिशा भर बाराच्या सावलीसारखी, पायापायात घुटमळणारी-घोटाळणारी. सायंकाळच्या सावलीसारखे लांबलांब पसरून तिने भुतासारखे कधी भेडसावले नाही, भेवडावले नाही. मास्तरासारख्यांचे आपले हे गणितच होते. केशवसुत या पठडीबाहेर आहेत. मास्तर ही पठडी एक पण केशवसुतांच्या जागेपणाच्या, सावधानतेच्या पायरवाने पठडीचा मार्ग बदलला आहे, वेगळा झालेला आहे. त्यामुळे केशवसुत कविमास्तर असले तरी 'हल्लक' कवि-मास्तर नाहीत, काव्यात्म पिंडाचे आणि संवेदनाक्षम मनाचे कविमास्तर होते. त्यामुळेच कवीच्या अंतः-करणात फुटलेला उचंबळ तसाच मांडला गेला नाही तर त्यास सावध मनाने टिपलेल्या, तरल हृदयाने वेचलेल्या आणि जागृत मनोवृत्तींनी संचित केलेल्या जीवन-लक्षी क्षणकणांची डूब मिळाली. साहजिकच केशवसुतांची कविता केवळ कविता राहिलेली नाही तर काळ अधिक काव्य मिळून विचार-कविता बनून आली. केवळ ती कविताच असती तर कलात्मकतेची चढती उतरती भांजणी मांडून कलात्मकतेच्या तरल-



अनुक्रमणिका






शवल पातळचा दाखवून सोडून देता आले असते (अर्थातच जे सोपे नाही आणि पंडिताखेरीज बहुजनांना महत्त्वाचेही नाही) पण केशवसुतांच्या कवितेत त्यांचा प्रक्षोभांनी गर्दी केलेला काळ, त्यांचे तत्त्वचिंतक मन आणि भावनाप्रधान कविप्रकृति सारेच एकमेकात अडकून पडलेले असल्याने केवळ कलात्मकतेच्या उंचसखल, लांब-रुंद, उथळ, खोल पातळ्यांहून दूरवर जाणे क्रमप्राप्तच होते. मात्र असे जायचे तर परिस्थितीचे मापन हवे. कविकालीन विचार-वादळांचे मापन करू देणाऱ्या केशवसुतांच्या कवितेची ती अनिवार्य गरज आहे. या संदर्भाने 'समग्र केशवसुत'-कार प्रा. भ. श्री. पंडित लिहितात, "केशवसुतांचा जन्म झाला त्यावेळी या देशात इंग्रजी राजवट प्रस्थापित होऊन जवळजवळ अर्धशतकाचा काळ लोटला होता. जुने झपाट्याने जात होते आणि नवे हळहळू येत होते. हा काळ संक्रमणाचा होता. ज्यांनी जुनी पेशवाई पाहिली होती आणि आता नव्या आंग्लाईत जे तडजोडीने स्वतःस सामावून घेण्याचा प्रयत्न करीत होते, त्यांच्या मनात नव्या-जुन्या विचाराचे मंथन चालू होते. विष्णु कृष्ण चिपळूणकरांच्या निबंधमालेचा वाङ्मयीन आविष्कार झाला, त्यापूर्वी चाळीस पन्नास वर्षांपासून महाराष्ट्रात जांभेकर, भाऊ महाजन, फुले, लोकहितवादी, विष्णुशास्त्री पंडित आदी सुधारकाग्रणींचे नवविचार दर्पण, दिग्दर्शन, ज्ञानोदय, ज्ञानप्रकाश, प्रभाकर, इंदुप्रकाश इत्यादी नियतकालिकांच्या माध्यमातून व सार्वजनिक सभा-समारंभातून प्रसृत होत होते.. निबंधमालेच्या वाङ्मयीन आविष्कारानंतर महाराष्ट्रात जे राजकीय व सामाजिक विचार प्रसृत झाले त्यांच्यावर मात्र पाश्चात्य संस्कृतीची छाप होती. राजकीय विचारात राष्ट्रवादाचा विचार प्रमुख होता आणि हा आपला देश काल परवापर्यंत परतंत्र असल्यामुळे त्या अनुकूल वातावरणात त्या राष्ट्रवादाची ज्वलंत ज्योती जिकडे तिकडे तेवत होती. सामाजिक विचारांवर गिबन्, मिल, स्पेन्सर आदी पाश्चात्य चिंतकांच्या विचारांची छाया होती." ही संक्रमणावस्था कालेकरून पक्व बनली. तत्कालीन उलटसुलट वैचारिक झंझावाताने (आणि इतर प्रयत्नांनी) तिच्या पक्वतेस साहाय्य पोचविले. मग नवी दृश्ये, नवी ध्येये, नवी रूपे, नवी मनोगते मनात उसळली. त्यांचा उलगडा करताना "केशवसुतांचा काळ व कवी" मध्ये प्रा. ना. के. बेहेरे सांगतात, "आपली प्राचीन परंपरा अत्यंत थोर, आपले राष्ट्र अत्यंत वैभवसंपन्न, आपला इतिहास दिव्य व अभिमानास्पद, आपला धर्म उदार व सर्वसंग्राहक, आपली संस्कृती श्रेष्ठ असताना केवळ विषारी रूढींच्या नि घातकी आचारांच्या वाढीने आपल्या थोरवीस कलंक लागला; दिव्यावर आलेली ही काजळी झाडून टाकली तर आपले वैभव आपणास पुनरपि प्राप्त होईल व आपले राष्ट्र समर्थ, संपन्न व स्वतंत्र होईल असा आत्मविश्वास व स्वाभिमान या धुरिणांच्या ठिकाणी होता. इंग्रजी विद्येची मूलभूत तत्त्वे त्यांनी आत्मसात केली व इंग्रजांच्या राष्ट्रीय सद्गुणांचे अनुकरण करण्याचा प्रयत्न केला. इंग्रज आपल्या देशावर विलक्षण प्रेम करतात, आपणही आपल्या हिंदमातेला देवतेप्रमाणे पूज्य मानू व तिच्या स्वातंत्र्यासाठी आपले प्राण अर्पण करावे लागले तरी ते अर्पण करू. इंग्रजांचा धर्म एकेश्वरी आहे; वेदांतात देखील ईश्वर एक आहे असेच सांगितले आहे; ख्रिस्तीधर्म स्वीकारण्याची आपणाला मुळीच गरज नाही, आपण आपल्या उपनिषदांचा अभ्यास करू व ते प्राचीन थोर हिंदी तत्त्वज्ञान जगात प्रसृत करू. आपल्या देशात माजलेल्या जातीभेदाला तिलांजली देऊ व अस्पृश्यतेचे भूत गाडून टाकू; मग आपला समाजही ख्रिस्ती किंवा मुसलमानी समाजाप्रमाणे संघटित होऊन बलशाली बनेल. स्त्रियांना शिक्षण देऊन व पुरुषांच्या बरोबरीने त्यांना समान हक्क देऊन आपण त्यांना भोगदासी न लेखता इंग्रजांप्रमाणे खऱ्या सहचारिणी बनवू... इंग्रजांना आपल्या इतिहासाचा अभिमान वाटतो, मग आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाचा अभिमान आपणाला का वाटू नये?.. इंग्रजी भाषा व वाङ्मय थोर खरे, परंतु आपली मराठी भाषा काय हलकी आहे? . याप्रमाणे महाराष्ट्रात स्वधर्म, स्वदेश, व स्वभाषा यांच्या अभिमानाचे वारे वाहण्याला प्रारंभ झाला होता. हिंदुस्थानातील इतर प्रांतापेक्षा महाराष्ट्रात या वाऱ्याला विक्राळ वादळी स्वरूप येऊ पाहत होते. रानडे, चिपळूणकर, टिळक, आगरकर या चौरस देशभक्त पंडितांनी स्वातंत्र्याची व आत्मोद्धाराची दुहेरी व










दुधारी चळवळ जोराने चालविली होती.'' अशा वादळी काळात उभ्या असलेल्या केशवसुतांनी वादळाचे सम्यक् आलोडन करून अनुभवांचे रेखांकन केले. म्हणूनच ते केवळ कवी राहिले नाहीत. त्यांनी पहिली उचकटली ती मास्तरकीची कळकलेली चिवटजिवट चौकट आणि दुसरी गंधर्वनगरीत रममाण होणाऱ्या केवळ कविप्रकृतिची ! या चौकटींच्या उखडण्यातून बंड करणाऱ्या कवींचे बंड निर्माण झाले. वादळी काळात केशवसुतही एक वादळ बनले. मूळ वादळाहून मोठे वादळ ! असे वादळ पेलण्याचे, त्यावर स्वार होऊन राहण्याचे सामर्थ्य असल्याखेरीज टिकणे शक्य नव्हते. (म्हणजे इतिहासात नोंद राहिली असती. शताब्दीचे भाग्य लाभले नसते.) बदलता काळ स्वीकारू इच्छित असलेल्या राष्ट्रस्वातंत्र्य, बुद्धी-प्रामाण्य, व्यक्तिस्वातंत्र्य आणि ऐहिकतेचे सुख-संवर्धन यांच्या आवश्यक जयजयकारात वादळ बनूनच सामावणे शक्य होते-अन्यथा वाहवण्याखेरीज गती नव्हती. केशवसुतांच्या प्रतिभेने हे शक्तिशालीत्त्व दाखविले त्यामुळे त्यांची कविता त्यांच्या काळातील नवमूल्यांच्या आत्माविष्करणाचे अपत्य आहे. ती नटवे नर्तन न करता शाहिराचा जोस घेऊन येते ती त्या काळाच्या संदर्भात ! मात्र केशवसुतांची कविता म्हणजे केवळ काळाची बखर नव्हे, खबर तर नव्हेच नव्हे ! आत्मावलोकनाने आत्मबल घेणाऱ्या काळा-तील केशवसुतांच्या कवितेने आत्मबळाने परिप्लुत कवितेला जन्म दिला आहे. आत्मघातकी पुरातन परंपरांविरुद्ध पुरोगामी प्रवृत्तींचा पुरस्कार यांच्या अटीतटीच्या सामन्यात केशवसुतांच्या अंतर्भेदी प्रति-भेने स्वतंत्र खाणाखुणांची स्पष्ट लावणी केली आहे, प्रत्ययकारितेने जीवनाभिमुखतेचा मार्ग चोखाळला आहे. त्यामुळेच "केशवसुतांची कविता वृत्तिवाचक तर आहेच; परंतु तिच्यावर तिच्या युगाचा, वाता-वरणाचा व परिस्थितीचा फार खोलवर ठसा उमटला आहे. त्यामुळे ती जातिवंत व जिवंत वाटते. त्यांच्या पूर्वीच्या पिढीतील कविता यांत्रिक आहे. त्या पिढीतील कवी कवितेचे यंत्र चालवीत आहेत असे वाटते. केशवसुतांच्या कवितेत चैतन्य आहे. ती स्वतः हालते. स्वतः चालते, स्वतः बोलते. आणि रसिकाच्या अंतःकरणाला हात घालते.'' "समग्र केशवसुत': प्रा. पंडित : ६३) केशवसुतांच्या कवितेची ही ताकद त्यांच्या कवितेच्या जन्महेतूत आहे. ह्या जन्महेतूचे धागेदोरे केशवसुतांच्या कविप्रवृत्तीच्या पिंडात, त्यांच्या काळातील परिस्थितीत, त्या काळातील नवमूल्यांच्या पुढाकारात सापडतात, आढळतात. मग प्रत्यक्ष कविता कोणते हेतू बोलून दाखविते ? काय सांगते ?

केशवसुत 'शुरु हुवा है जंग हमारा' अशा प्रतापी कालखंडात उभे असल्याने केशवसुतांच्या मुळातल्या बंडखोर वृत्तीने, उफाळून उठण्याच्या स्वभावाने, उचंबळून येण्याच्या प्रवृत्तीने विकृतीवर-- मग ती कुठलीही आणि कसलीही असो-- हल्ला चढविला आहे. विकृतीवर घणाघात करावेत, त्या घणाघातातही चांगले टिकवून धरता आल्यास ठेवावे, बाकी सारे उडवून लावावे नवे निर्मावे-स्थापावे असा नेम आहे. तिथे कोमलता असलीच तर आपद्धर्मे येणारी, नजाकत आढळली तर जाता जाता वाट पुसणारी. पण कलेच्या माफक जाणीवेबरोबरच 'परिस्थिती वेडेपण' असल्याने कणखरतेने घावामागून घाव घालावेत हीच मुख्यतः वृत्ति. या वृत्तीने आणि स्वभावाच्या स्वाभिमानी बैठकीने ज्याचा जन्म खाली मान घालून जायचा अशा दुर्मुखलेल्या मितभाषी केशवसुत-मास्तरांना विलक्षण जोर मिळाला आहे, जोसाचा नेट लागला आहे. तिथे नाजूक साजुक पणाला अवसर नाही की मेंगळा व्यवहार नाही. त्यामुळे केशवसुतांची कविता मनोरंजन करण्यासाठी किंवा करमणूक साधण्यासाठी म्हणून अवतरत नाही. ती जाणता-अजाणता हेतुशःच अवतरते. कवी केशवसुत अंगदी मोजूनमापून, ठरवून बिरवून- अमके अमक्या पद्धतीने सांगायचे, तमके तमक्या पद्धतीने मांडायचे अशी इंच न् इंच फूटपट्टी लावून-- लिहितात असा 'हेतुशः' चा अर्थ नाही. सहजच लिहितात पण सहजोद्रेक आखणीच मुळी हेतुपूर्णतेने करतो. त्यात 'हेतुशः' सकट कला, विचार आणि काव्य ही सारी येतात. तीत कुणा एकाची निखळ निखळता असे असत नाही. त्यामुळे हेतुच्या पाठबळाने उभ्या असलेल्या केशवसुतांच्या कवितेतील केवळ कलांगांच्या तरलतेचा शोध घेऊ म्हटल्याने फसगत होते, नाडी बरोबर लागत नाही;

## केशवसुतांच्या कवितेचा जन्महेतू :

'स्टेथास्कोप' पुन:पुन्हा लावला तरी धडधडीचा अर्थ कळत नाही.

केशवसुतांच्या कवितेत अशी कोणती धडधड धडपड करते? या धडधडीच्या धडपडीचे संकलित रूप मांडायचे तर केशवसुतांची कविता एक मिश्रराग आहे असे म्हणता येईल. मात्र या मिश्र रागात खालीवर असे नसून साऱ्यात समधातता आणि समतोलता आहे. कवितेचा सातत्याने तोल सांभाळण्याचे कौशल्य कवीने दाखविले आहे. त्याच्या तालतोलाचा तो विशेष गुण म्हणता याधा इतके त्याचे महत्त्व आहे. केशवसुतांच्या कवितेचा वेदनानिग्रह हा पहिला राग, कवीला लाभणारा आनंद हा दुसरा आणि आत्माविष्करण हा तिसरा असा हा मिश्रराग आहे. केशवसुतांच्या दृष्टीने या संकलित 'एक' रागातील कलात्मकता आणि सामाजिकता यात विरोध नाही. त्यातूनच आपल्याला 'नवीन कविता' लिहायची आहे याची प्रखर जाणीव कवीच्या मनात दिसते. तशी ती निर्माण होताना समाजस्थितीतील अनृत, विटाळ, विकृत ते दूर राखून समाजजीवनाचा सांस्कृतिक दर्जा, प्रतिष्ठा आणि शोभा वृद्धिंगत करण्याची केशवसुतांच्या कवितेची धडपड आहे. राधेकृष्णाची बुळबुळीत गाणी गाण्यासाठी दिव्य शक्तीचे स्फुरण नाही, तिला गर्जायची आहेत संघर्षातून निर्माण होणाऱ्या 'परमानंदे परिपूर्ण' जगाचा आकार घेऊ पाहणाऱ्या कल्पनेची गाणी. "जे रम्य ते बघुनिया" "गाणे सवेचि मनात होय जागे" तें केवळ सृष्टीतले 'रम्य' पाहून नव्हे तर 'त्या' जगाचे 'रम्य' रूप पाहून! त्यासाठी सारखी धडपड, जमेल तेवढी, झेपेल तेवढी धडपड आहे. 'फुकट दवडलेल्या तासा' बद्दल त्यामुळेच दुःख प्रगट होते. जो क्षणाचा विचार करीत नाही त्याच्या हातून अनंत काळ निसटतो. म्हणून क्षणाचा विचार आवर्जून केला आहे. मात्र केशवसुतांच्या कवितेचा सारा आटोप किंवा सारा खटाटोप हा पक्षवाज पद्धतीने कुठला तरी 'एक विचार सांगावा ,असा नाही तर समुद्धारक तत्त्वांचा उच्चार-स्फुरण, त्या दिशेचे मार्गक्रमण अशी तिची वाटचाल आहे. 'आज' मध्ये जे नाही ते 'आज' मधूनच 'उद्या' साठी लावणी करून आपल्या कवितेच्या प्रकाशस्फूर्तीने अधारी अंत:करणात उगीच तग धरून असलेली पणती उजळता येईल तेवढी उजळावी असा हेतू आहे. या पणतीच्या प्रकाशात जगायचे कसे आणि कशासाठी याचा शोध घेता येईल अशी आशा आहे. ही आशा अंधुक हे खरे पण डॉ. प्रा. रा. शं. वाळिंबे यांनी म्हटल्याप्रमाणे, "काव्यविषयक मूलभूत कल्पना टाकून नवीन कल्पनांची प्रस्तावना करावयास पाहिजे हा विचार प्रथम केशवसुतांच्या कवितांमध्ये स्पष्टपणे प्रकट झाला. भोवतालच्या अचेतन, निरुद्योगी व उदास जगाला चैतन्य देणे हे कवितेचे कार्य होय हा विचार केशवसुतांनी पुन:पुन्हा मांडला आहे". स्थूलरुपाने हा तिचा हेतुउद्देश आहे, अखेरीस साधायचे काय यासंबंधी प्रायः अस्पष्टता आहे. केशवसुतांनी आपल्या कवितेचा जन्महेतु सांगताना "कवितेचे प्रयोजन' मध्ये म्हटलेच आहे :

आलेल्या दुरवस्थितीतुनि तुम्ही उत्तीर्ण व्हाया जरी,
उद्योगी रत व्हावया धरितसा औत्सुक्य चित्ती तरी,
गाण्याने कविच्या प्रभाव तुमचा वर्धिष्णुता घेइल,
स्फूर्तीचा तुमच्या पिढयास पुढच्या साक्षी कवी होईल.

केशवसुतांच्या बव्हंशी कवितेचा हा सूर आहे. अंत:स्फूर्तीने तो लावला आहे. केशवसुतांच्या समग्र कवितेच्या आलोचनात त्याचे पदविन्यास आढळतात.

---

प्रा. साधना जनार्दन उपाध्ये

# संस्कृत काव्यान्तर्गत कथावस्तूमधील बदल व काव्यात्मता

### मूळ कथावस्तूत केलेला बदल
### –केव्हा कलापूर्ण ठरेल ?

एकंदरीत संस्कृत काव्यांचे एक ठळक वैशिष्टच म्हणजे बहुतांशी ती कथाप्रधान काव्ये आहेत. नाटकांचा ह्यात अंतर्भाव होतो हे वेगळे सांगण्याची आवश्यकता नसावी. दुसरे, बहुतेक कवींनी आपल्या काव्यासाठी कथावस्तू ही बहुधा पुराणे, महाकाव्ये इत्यादी पूर्वरचित काव्यांमधून वा काव्यांवरून घेतलेली दिसते. परंतु असे करीत असताना कथावस्तू–घटना, व्यक्तित्वे इत्यादी मूळाबरहुकूम घेतलेली क्वचितच आढळतात. बहुधा ह्या प्रत्येक काव्यामध्ये घटना, व्यक्ती, त्यांची अर्थपूर्णता– त्यामधून सूचित केला जाणारा आशय, ह्यांमध्ये कोठे ना कोठेतरी नावीन्य निर्माण केलेले दिसते. हे नावीन्य काहीवेळा कल्पित पात्रे वा घटना निर्माण करून केले जाते तर काही वेळा घडलेल्या विवक्षित घटनांचा काळ थोडासा बदलून सूचकपणे केले जाते. हे अनेकप्रकारांनी केलेले दिसते. त्यापैकी काही उदाहरणादाखल :

(१) भासाच्या 'प्रतिमा' ह्या नाटकातील कैकेयीचे व्यक्तित्व.

(२) महाभारतातील शकुंतलाख्यानात कालिदासाने घातलेली दुर्वासशापाची भर.

(३) महाभारतातील कर्णाख्यानामध्ये वेळोवेळी अनेक कवींनी घातलेली भर. उदा. ० कौरव-पांडवांची अस्त्रपरीक्षा, द्रौपदीवस्त्रहरण इत्यादी.

(४) भवभूतीने रामकथेमध्ये घातलेली चित्र-दर्शनाची भर.

(५) भवभूतीच्या उत्तररामचरितातील 'छाया नाम प्रवेश' (अंक ३ : प्रवेश ३).

(६) अनेक प्रमुख व दुय्यम घटना मोठ्या नाट्यपूर्ण रीतीने (!) एकाचवेळी घडताना दाखविणे व पुढे कालांतराने एखाद्या दुय्यम घटनेबद्दल एखादी सामान्य भूमिका प्रवेशकासमान प्रवेशात बोलताना दाखवून अप्रत्यक्षपणे प्रधान घटनेच्या संदर्भात मोठ्या कौशल्याने सूचना देणे (येथे विद्यार्थ्यांसाठी लेखक Reference to Context ची वाक्ये तयार करीत असतो !) हा प्रकार मात्र जवळजवळ प्रत्येक काव्यात कवींनी अत्यंत आवडीने अवलंबिलेला दिसतो.

आता प्रश्न असा निर्माण होतो की अशा प्रकारे कथावस्तूमध्ये बदल करणे गुणस्वरूप व कलापूर्ण कधी होऊ शकेल ?

अनपेक्षितता हा जीवनाचा धर्म असेल. अर्थात, जीवनात ज्या घटनांवर अनपेक्षिततेचा शिक्का मारला जातो त्या वास्तविक पाहाता अपरिहार्यपणेच घडलेल्या असतात. परंतु जोपर्यंत त्यांची संगती, कार्यकारण-भाव व अर्थ लागत नाही तोपर्यंतच आपण त्यांना अनपेक्षित दैवी इत्यादी नांवे देत असतो. म्हणजेच, अनपेक्षित वाटणाऱ्या घटनासुद्धा अपरिहार्यपणे घडणे हाच जीवनाचा खरा धर्म आहे. मग, जीवनाचे चित्र पुन्हा निर्माण करणाऱ्या ब्रह्मचाला म्हणजेच कलावंताला वास्तविक पाहाता त्यानेच निर्माण केलेल्या व्यक्तींच्या मनाची, त्यांच्या उक्तिकृतींची, त्या वास्तवामध्ये घडणाऱ्या प्रत्येक घटनांची संगती लागली पाहिजे; म्हणजेच योगायोग टाळता आले पाहिजेत. शिवाय, त्याला जाणवलेली अर्थपूर्णता पटून, पटवून व्यक्त करिता आली पाहिजे. ही अर्थ-पूर्णता व कार्यकारणभावाची संगती लावण्यासाठी व कलाकृती स्वयंपूर्ण व संपूर्ण करण्यासाठी कलावंत काही वेळा काही घटना बदलत असतो, काहींची भर घालीत असतो आणि म्हणूनच, जोपर्यंत हे बदल वा ही घातलेली भर ही पूर्वरचित काव्यांमधून व्यक्त होऊ पाहाणारी व्यक्तिचित्रे वा त्यामधील आशय ह्यांना अधिक जाणून घेण्यासाठी किंवा त्या जीवना-माग ल एक नव्याने जाणवणारा अर्थ व्यक्त करण्या-साठी असेल तोपर्यंत कलापूर्ण होऊ शकेल. अर्थातच,










हे करीत असताना एक बंधन सतत पाळावे लागेल. ते म्हणजे ज्या वास्तवामधील ज्या जीवनामधून ह्या व्यक्ती व त्यांचे जीवन उचललेले असेल त्यांना धक्का न लावणे हे होय. किंबहुना, असे म्हणता येईल की, त्या आशयावर वा व्यक्तिमत्त्वावर अधिक वा नवा (नव्या दृष्टीकोणामधून) प्रकाश टाकीत असताना त्यांचे व्यक्तित्व हरवून बसून चालणार नाही. नवा अर्थ व्यक्त करू पाहाणाऱ्या कलाकृतींच्या परिशीलनाने (१) त्या वास्तवामधील ते व्यक्तित्व असणाऱ्या त्या व्यक्ती (२) अधिक जवळून, अधिक समंजसपणे पाहिल्याचा दुहेरी अनुभव आला पाहिजे. म्हणजेच, वास्तव, त्यामधील व्यक्ती व त्यांचे जीवन ह्यांचे स्वरूप संपूर्णपणे वेगळे रेखाटून चालणार नाही. तरच तो बदल वा नवनिर्मित तपशील हा अर्थपूर्ण म्हणून गुणस्वरूप मानता येईल. त्याचप्रमाणात ते कलापूर्ण : काव्यात्म मानता येतील.

ह्या दृष्टीने वरील फेरबदलाचे प्रकार तपासून पाहायचे तर भासाच्या 'प्रतिमा' नाटकातील नवनिर्मित अर्थपूर्णता ही खरी गुणस्वरूप व कलापूर्ण म्हणता येईल. 'प्रतिमा' नाटकामध्ये (मूळ रामायणाप्रमाणेच) सीताहरण व त्यानंतरचे रामरावण-युद्ध यांची वार्ता समजल्यावर भरत कैकेयीला उपरोधिकपणे आनंददायक वार्ता देण्याच्या आविर्भावात त्यांचे कथन करितो. तेव्हा भासाची कैकेयी भरताला सांगते, "तू कोणत्या मनाने हे मला सांगावयास आला आहेस हे मला समजते. परंतु माझे रामावर प्रेमच आहे. तुझ्या पित्याला श्रावण-पित्याच्या शापाने पुत्रवियोगाने मृत्यू येणारच होता. परंतु माझ्या वरांच्या साहाय्याने पुत्रवियोगाचा अर्थ पुत्रमरण ठरू न देता काही काळ पुत्रवियोग असा ठरविला."

येथे दिसते ती कैकेयी रामायणातील ककेयीच आहे. वास्तविक पाहता ह्या नाटकात कोणत्याही तपशिलाची नवनिर्मिती वा बदल नाही. मग ह्याला नवनिर्मिती म्हणता येईल का?—होय. येथे त्याच तपशीलाच्या एका नव्या अदुराग्रही निर्मळ मनाने केलेल्या नव्या अवगाहनाने कैकेयीच्या व्यक्तिमत्वाचा व उक्तिकृतींचा लाविलेला अर्थ निश्चितपणे नवा आहे. भवभूती वा इतर कवींप्रमाणे कैकेयीचे उदात्तीकरण करण्यासाठी भासाला एखाद्या राक्षसीला मंथरेमध्ये प्रवेश करायला लावण्याची आवश्यकता भासली नाही. किंबहुना, दशरथाला राजनीतीमध्येही सल्ला देणाऱ्या समरप्रसंगी त्याच्या बाजूला असणाऱ्या बाणेदार अर्धांगी कैकेयीची ओळख एका राक्षसीने पछाडलेल्या, रोजच्याहून वेगळ्या वागणाऱ्या एका सामान्य दासीच्या आधीन होणाऱ्या कैकेयीच्या रूपामध्ये पटत नाही. अशा प्रकारचा बदल तिचे व्यक्तिचित्र बदलून टाकतो. परंतु सुखदुःखात व संकटातही दशरथाची सहधर्मिणी असणारी कैकेयी जेव्हा श्रावणपित्याच्या शापाची आठवण करून आपण मागितलेल्या वरांची मीमांसा करिते तेव्हा ते पटते. येथे आणखीही एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. रामायणात दशरथ जेव्हा परत आल्यावर वसिष्ठांना शापवाणी कथन करीतो तेव्हा वसिष्ठ त्याला सल्ला देतो की 'निदान ब्राह्मणाचा शाप खरा होण्यासाठी—म्हणजे पुत्रवियोगाने मृत्यू येण्यासाठी का होईना तुला पुत्रप्राप्ती होईल. तेव्हा ही शापवाणी वर मान आणि पुत्रकामेष्टी यज्ञ कर.' असा उल्लेख रामायणात आहे. परंतु त्या शापावरील उःशापाचा मात्र कोठेही उल्लेख नाही. आणि म्हणूनच भासाच्या 'प्रतिमा' नाटकाचे परिशीलन करीत असताना रामायणातील कैकेयी भेटल्याचा आनंद होतो. आणि म्हणूनच, रामायणाच्या वास्तवाला व तदन्तर्गत सुसंगतीला किंचितही धक्का न लावता त्यामधील व्यक्तिचित्रावर व जीवनावर टाकलेला हा नवा प्रकाश निश्चितपणे गुणस्वरूप व कलात्मक आहे.

महाभारतातील शकुंतलाख्यानात कालिदासाने घातलेल्या दुर्वासशापाचा बराच गौरव केला जातो, त्यामुळे अपरिहार्यता वाढते व अंतर्गत सुसंगती निर्माण होते व परिणामी काव्याच्या काव्यात्मतेत भर पडते असेही म्हटले जाते. आणि, राजाश्रयामुळे राजांची तरफदारी करण्यासाठी दुर्वासशापाची भर घातल्यामुळे 'अभिज्ञानशाकुंतलाख्याना' कडे एक कथाकाव्य म्हणून पाहिले असता कदाचित एक अंतर्गत सुसंगती निर्माण होत असेल. परंतु शकुंतलाख्यान हे महाभारता-चा एक घटक-भाग आहे. व महाभारत हे गीतेमधील तत्त्वज्ञानाचे समूर्त रूप आहे हे विसरून चालणार नाही. अशा ह्या महाभारताचा विशेष म्हणजे

श्रीकृष्णाखेरीज येथे आहेत ती सर्व माणसे आहेत : आत्मज्ञान न झालेली– अहंमन्य, वा ज्ञान झालेली पण कोणती ना कोणती उणीव असणारी. जीवनामधील सत् व असत् ह्या प्रवृत्तींचे व त्यांमधील संघर्षामधून निर्माण होणाऱ्या जीवनाचे ते रूप आहे. म्हणून महाभारतात दुष्यंत शकुंतलेची ओळख देत नाही तेव्हा तो असतो राजा असणारा एक माणूस, व शकुंतला त्याचा तेजस्वीपणाने धिक्कार करिते तेव्हा ती असते एक तेजस्वी सत्चरित्र पतिव्रता स्त्री. तो संघर्ष दोन प्रवृत्तींमधील संघर्ष आहे. व त्यावेळी व्यक्त होणारे तिचे तेजस्वी व्यक्तिमत्त्व हे एक सत्प्रवृत्त स्त्रीचे चित्र आहे. तर येथे मात्र कालिदासाने दुर्वासशापाने राजाला आदर्श करून सोडले आहे. त्यामुळे कालिदासाची शकुंतला जेव्हा राजाचा धिक्कार करिते तेव्हा मन म्हणत असते 'अशी आहे नियती' तर महाभारतामध्ये हे आख्यान येते ते 'असा आहे माणूस' ह्याची प्रतीती आणून देण्यासाठी. आणि म्हणूनच कालिदासाने घातलेल्या दुर्वासशापामुळे शकुंतलाख्यानातील शकुंतलेच्या व्यक्तिमत्त्वातील तेजस्विताच नुसती कमी होत नाही, तर ज्या आशयाला मूर्त करण्यासाठी ह्या आख्यानाचा तपशील व्यासाने निर्माण करून रंगविला तो आशयच बदलतो, त्याच्या प्रतीतीमध्ये निश्चितपणे एक उणीव निर्माण होते.

तेच भवभूतीच्या चित्रदर्शनाचे ! रामायणामध्ये चित्रदर्शन नाही. सीता त्यागापूर्वी सीता कठोरगर्भा तर नाहीच. लक्ष्मण सीतेला पंचवटीत सोडून जाऊ लागतो तेव्हा सीता लक्ष्मणाला सांगते की 'तुझ्या भ्रात्याला, त्या राजश्रेष्ठाला व माझ्या पतीला जाऊन सांग की, सीता गर्भवती आहे व तिला आज एक मास पूर्ण झाला आहे.' सीतेच्या गर्भवती स्थितीचा रामायणातील हा प्रथम उल्लेख ! व तो येतो तोही अपरिहार्यपणेच. कारण सीतेच्या पातिव्रत्याबद्दल अग्निप्रवेशानंतरही जनमनात अकारण शंका निर्माण झाल्याने रामाने सीतेचा त्याग केला. तेव्हा सीतेच्या ह्या स्थितीची कल्पना कुणालाही नव्हती. तेव्हा सीतेला वनात अपत्यप्राप्ती झाल्यावर तिच्या पातिव्रत्याबद्दल शंका पुन्हा बळावू नये म्हणून सीता लक्ष्मणाकरवी निरोप पाठविते. किंबहुना, रामायणात सीतेला पंचवटीत नेऊन सोडण्याची लक्ष्मणाला आज्ञा देताना राम म्हणतो, ? "पंचवटीत पुन्हा एकदा जाऊन राहण्याची इच्छा सीतेने एकदा व्यक्त केली होती" ती इच्छा एकदा व्यक्त केली होती. तेव्हा अशी इच्छा मनात धरणारी सीता ही रामाची नुसती पत्नी आहे. अनामिकाचे सुख मोठे असते. वनवासात असताना राम-सीतेला राजसुखे मिळाली नसतील परंतु पति-पत्नी म्हणून सहवासाचा अनिर्बंधपणे अखंड सुखलाभ झाला. परंतु राम पुन्हा अयोध्येला आल्यावर मात्र त्यांच्या पतिपत्नी ह्या भूमिकांपेक्षा महाराजा व महाराणी ह्या भूमिकांना अधिक महत्त्व प्राप्त होते. आणि म्हणून राजसुखे प्राप्त झाली तरी राम पती म्हणून लाभावा– तोही अलक्षित, अनिर्बंध. आणि अशा संसारसुखांचा उपभोग ज्या पंचवटीत घेतला तो वास पुन्हा घडावा अशी इच्छा सीता महाराणी झाल्यावर एकदा व्यक्त करते. ते पटते. कारण राम व सीता उच्च व उदात्त आदर्शाच्या प्रतिमा असल्या तरी वाल्मिकीचे वैशिष्टच हे की ती माणसे आहेत, त्यांना मन-भावभावना आहेत. फक्त कर्तव्याआड त्या व्यक्ती त्या मनाला व भावभावनांना येऊ देत नाहीत. त्यातच त्यांचे, रामायणाचे व वाल्मिकीचे मोठेपण आहे. परंतु भवभूती जेव्हा उत्तररामचरित्रामध्ये चित्रदर्शनाची भर घालतो, चित्रदर्शनानंतर कठोरगर्भा सीतेच्या तोंडी पंचवटीवासाची इच्छा घालतो व कठोरगर्भा स्त्रीची इच्छा पूर्ण केली पाहिजे ह्या सर्वसामान्यांच्या जीवनातील एका अलिखित नियमाचा उल्लेख करतो, तेव्हा, मला वाटते रामायणातील आदर्शरूप उदात्त व्यक्तींना आपण, नाही म्हटले तरी थोडेसे आपल्या पातळीवर आणीत असतो. येथे मूळचे वास्तव भंगते.

महाभारतातील कर्णाच्या उपकथानकातही व्यासोत्तर कवींनी अनेक घटनांची भर घातलेली आहे. वास्तविक मूळ महाभारतात अस्त्रपरीक्षेचा प्रसंग नाही. द्रौपदीस्वयंवरप्रसंगी कर्णाने मत्स्यभेदकरण्यासाठी उठण्याचा प्रसंग नाही. तसेच द्रौपदीवस्त्रहरण नाही. आज कर्णाचे चित्र जेव्हा रंगविले जाते तेव्हा ह्याच घटनांच्या साहाय्याने प्रामुख्याने त्याचे असत्मय रूप अधिक भडक केले जाते. शेवटी श्रीकृष्ण जेव्हा अर्जुनाला 'अधर्मी माणसाला अधर्माने मारणे हाच धर्म होय' असे निक्षून सांगत असताना अलिकडील








लेखन कर्णाचे अधर्मी रूप स्पष्ट करण्यासाठी ह्याच घटनांचा प्रामुख्याने उल्लेख करीत असतात. कर्ण-कुंती संघर्षातही ह्याच 'अस्त्रपरीक्षा' नाम घटनेला महत्त्व दिले जाते. म्हणजे, ज्या घटनांना आज महत्त्व दिले जाते त्या मूलतःच विवाद्य आहेत. आणि म्हणूनच श्रीकृष्णाच्या उद्‌गाराचे मर्म जाणून घ्यायचे असेल, कर्णाचे व्यक्तिमत्त्व जाणायचे असेल तर कर्णाच्या चरित्रामधून ह्या प्रक्षेपित घटना वजा करता मुळावरहुकूम व्यक्त होणारे त्याचे व्यक्तित्व कोणते व ह्या प्रक्षेपित घटनांनी त्याचे रंग कसे व कोठे बदलतात हे पाहणे आवश्यक आहे.

दुर्योधनाने राज्यपद देऊनही शेवटपर्यंत इतरांनी व विशेषतः अर्जुनाने (अस्त्रपरीक्षा) व द्रौपदीने (स्वयंवरप्रसंगी) ज्याचा सूतपुत्र म्हणून पाणउतारा केला त्या कर्णाने पुढे जीवनामध्ये संधी मिळेल तेव्हा अर्जुन व द्रौपदी यांचा सूड उगविण्याचा प्रयत्न केला, अगदी अतिसामान्याच्या—तामसी पातळीला जाण्या इतपत प्रयत्न केला. ( विशेषतः द्रौपदीवस्त्रहरण ) ह्या घटनांमधून कर्णाचे व्यक्तित्व पाहात असताना ते निःसंशयच सामान्य वाटते. व कर्ण थोर का याचे आकलन होत नाही. श्रीकृष्णाने कर्णाला मनविण्याचा प्रयत्न का केला, स्वार्थी व स्वार्थासाठी येनकेनप्रकारेण बुद्धचा असत्‌मार्गाने जाणाऱ्या कौरवांपासून कर्ण वेगळा का हे नीटसे समजत नाही. परंतु ह्या घटना जर त्याच्या चरित्रामधून बाजूला काढल्या तर मात्र उरतो तो म्हणजे अहंभाव व स्वार्थ (परमार्थाने) न विसरलेला व त्या अहंच्या सुखासाठी बुद्धचा असत्‌मार्गाने जाणारांना मदत करणारा कर्ण. अर्जुनाच्या बुद्धीवरील 'हा मित्र, हा बंधू, हा शत्रू' ह्या जाणिवेचे पटल दूर करून त्याला डोळसपणे कर्तव्यतत्पर करण्यासाठी अर्जुनाला श्रीकृष्णाने गीता सांगितली. त्या गीतेचे तात्पर्य—

"चराचरसृष्टी हे परमेश्वराचे बिंबरूप आहे. अशी ही सृष्टी त्रिगुणात्मक-सात्त्विक, राजस व तामस-आहे. परमेश्वराबद्दलच्या म्हणजेच 'मी' बद्दल-या निखळ ज्ञान-अज्ञानामधून हे तीन गुण निर्माण होतात. ह्या अज्ञानामधूनच अहंभाव निर्माण होतो. अहंभाव असत्‌वृत्तीला प्रेरणा देतो. परंतु 'मी कोण आहे' चे आत्मज्ञान ज्याला झालेले असेल तो परमेश्वराचे बिंबमय विश्वरूप जाणू शकेल. अशा ज्ञानी परंतु सत्-प्रवृत्तांनी सत्‌चे, म्हणजे धर्माचे, म्हणजे परमेश्वराचे रक्षण करण्यासाठी त्यांना खाऊन टाकू पाहाणाऱ्या असत्‌प्रवृत्तींचा नाश करावा. हाच जन्माला येणाऱ्या प्रत्येक मनुष्यजाताचा— सत्‌प्रवृत्ताचा धर्म होय. कारण परमेश्वराचे बिंब म्हणून त्याचे ते कर्तव्य आहे. किंबहुना येथे नाश करणारा जसा परमेश्वराचे बिंब-रूप आहे त्याचप्रमाणे ज्याचा नाश करावयाचा तोही त्याचेच बिंबरूप आहे. म्हणजे करता आणि करविता तोच आहे. येथे फक्त अधर्मी प्रवृत्तींचा सत्‌धर्मी प्रवृत्तींकरवीं नाश करविला जातो. तेथे नाश करणारा त्याच्या अहंच्या सुखार्थ नाश करीत नाही तर कर्तव्यधर्मप्राप्त कर्म म्हणून करीत असतो व ते कर्म फलासहित त्याच परमेश्वराला अर्पण करून स्वतः निर्मल राहात असतो."

हे ज्ञान अर्जुनाला दिल्यावर तो युद्धाला प्रवृत्त झाला आणि त्यानंतर कर्णाच्या रथाचे चक्र भूमीने गिळलेले असताना श्रीकृष्णाने 'अधर्माला अधर्माने मारणे हाच धर्म होय' असा उपदेश केला. तो का ?

येथे अर्थ लागतो तो असा—

कर्ण उदार आहे; उदात्त आहे. इंद्राला ओळखूनही कवचकुंडले देण्याइतपत सत्वशील आहे. परंतु त्यात एकच हीण आहे. ते म्हणजे तो स्वतःला अर्जुनाचा प्रतिस्पर्धी मानतो. किंबहुना अर्जुनाशी स्पर्धा करीत असतानाच केवळ त्याच्यामधील सत् व असत् प्रवृत्तींचा झगडा होतो. परंतु तेवढ्यापुरती का होईना त्याच्या-मधील असत् प्रवृत्ती प्रबळ ठरते. केवळ ह्या अहंभावा-साठी—स्पर्धेसाठी तो कौरवांचा आश्रय करितो. येथे कदाचित कोणी कर्ण-दुर्योधनामधील मित्रत्वाचे नाते पुढे करतील. परंतु येथे एक गोष्ट नजरेआड करता येत नाही— श्रीकृष्णाच्या व कुंतीच्या भेटीनंतरही कर्ण अर्जुनाशी असणारी स्पर्धा विसरू शकत नाही.— विसरू इच्छित नाही. अर्जुनाप्रमाणेच त्यालाही निर्मळ आत्मज्ञान झाले असते तर कदाचित् त्याच्यामधला अहंभाव लोपला असता व त्या अनुषंगाने त्याने सुरू केलेली अर्जुनाबरोबरची स्पर्धाही संपली असती. व त्याच्यामधील सत्‌प्रवृत्तीवर मधूनच डोके वर काढ-णाऱ्या असत्‌प्रवृत्तीची जी काळी पडछाया पडताना दिसते ती लोपली असती. मग कर्ण-दुर्योधन मैत्रीची

कसोटीची वेळ आली असती. येथे फार तर तो तटस्थ राहिला असता. परंतु असत्‌चा हस्तक झाला नसता. असे हे कर्णाचे व्यक्तित्व आहे. परंतु हा अहंभाव जात नाही, स्पर्धा संपत नाही; व त्यासाठी अधर्माला तो आश्रय देतो, सामर्थ्य पुरवितो– हा पहिला अधर्म. व स्पर्धेसाठी, अर्जुनाला हरविण्यासाठी, व अधर्माला अधिक समर्थ करण्यासाठी परशुरामासारख्या व्यक्तीची तो जाणूनबुजून फसवणूक करितो हा दुसरा अधर्म. आणि कृष्णाच्या दृष्टीने पाहायचे तर– कर्णात खूप गुण असतील परंतु बुद्धचा अधर्माला साहाय्य करीत असताना सद्धर्मावरच आक्रमण होऊ पाहात आहे म्हणून येथे ते परमतत्त्व सत्‌ला पूर्णत्त्व देऊन त्याला ते असत् व त्याला बलवान् करणाऱ्या सामर्थ्याचा नाश करविते.

ह्या दोन चित्रांमध्ये फरक आहे. प्रक्षिप्त घटनांचा आधारे रंगविलेला कर्ण तामसी वाटतो. महाभारतातील कर्ण थोडासा राजस आहे. व त्या राजसी स्वार्थी वृत्तीमुळे त्याचे सात्त्विक गुण काजळतात. महाभारताचे संपूर्ण संशोधन करून त्यामधील कर्णाची व्यक्तिरेखा समजावून घेणे व देणे हा एक स्वतंत्र संशोधनाचा विषय आहे. परंतु एवढे मात्र निश्चित् की राजस कर्णाबद्दल जी सहानुभूती वाटते ती तामस कर्णाबद्दल वाटत नाही. येथे परिणाम व व्यक्तिरेखा यामध्ये अंतर पडते.

भवभूतीने चित्रदर्शनाप्रमाणेच 'छायानामप्रवेशा-' चीही रामकथेत भर घातली आहे. हा प्रवेश मात्र भवभूतीची संपूर्णपणे एक नवनिर्मिती आहे. राम सीतात्यागानंतर प्रथमच पंचवटीत येतो. व सीता तेथे गंगा व पृथ्वी यांच्या कृपेने छायारूपाने येते. ज्या पत्नि-सीतेबरोबर पति-रामाने पंचवटीत सहजीवन उपभोगिले. त्या रामाने राजा म्हणून कठोरकर्तव्य पार पाडीत असताना, पत्निसीतेचा त्याग केला. त्याग करतेवेळी रामायणाप्रमाणेच उत्तररामचरितातही राम-सीतेची समक्ष भेट होत नाही. त्यामुळे रामाने आपला त्याग का केला , प्रजेची निंदा हे निमित्त की कारण, रामाला आपल्या पातिव्रत्याबद्दल विश्वास आहे की नाही हे प्रश्न सीतेच्या मनात निर्माण होणे स्वाभाविक आहे. त्यांचे रामकथेला वा त्या व्यक्तिमत्त्वांना धक्का न लावता कलात्मरीत्या केलेले निराकरण म्हणजे छायानामप्रवेश होय. ह्या प्रवेशातील संपूर्ण कथाभाग नवनिर्मित आहे. रामायण व महाभारत ह्या महाकाव्यात वास्तविक पाहाता सर्वच घटना, उक्तिकृती स्पष्ट नाहीत. त्यातील खूपशा सूचक आहेत. किंबहुना त्यात कित्येक अध्याहृत जागा आहेत. त्या रसिकांनी टिपावयास हव्यात. त्या महाकाव्यांमधून जे व्यक्त होते त्याच्या साहाय्याने त्यांचा अर्थ लावावयास हवा. ते येथे भवभूती करितो– अत्यंत कलापूर्णरीत्या करितो.

आतापर्यंत ज्याप्रकारचे बदल पाहिले ते सर्व कलावंताच्या कल्पनाशक्तीने पूर्वरचित कथांचा व तदन्तर्गत व्यक्तींचा वा त्यांच्या उक्तिकृतींचा त्यांच्या प्रतिभेच्या कुवतीनुसार व प्रकृतीनुसार अर्थ लावीत असताना तो व्यक्त करण्यासाठी केलेले बदल होत. त्यांच्याशी कल्पकतेचा वा कल्पनाचमत्कृतींचा संबंध फारसा जोडता येणार नाही. त्यांचा संबंध आहे तो प्रत्यक्ष आशयाशी ! आणि म्हणूनच, मूळ व्यक्तिमत्त्वे, मूळ कथानक, त्यांचे श्रेष्ठ- कनिष्ठत्व, त्यांमधून व्यक्त वा सूचित होणारा आशय ह्यांना धक्का न लावता ज्या प्रमाणात हे बदल त्या मूळचित्रामध्ये अर्थ-सौंदर्याचे रंग भरू शकतील त्याप्रमाणात ते एकाचवेळी अर्थपूर्ण व कलापूर्ण, म्हणून गुणस्वरूप-काव्यात्म म्हणता येतील.

परंतु ह्या बदलाचे व नवनिर्मितीचे प्रकार येथेच संपत नाहीत.

अनेक घटना : काही प्रमुख व काही दुय्यम : मोठ्या कौशल्याने व नाट्यपूर्णरीतीने एकाचवेळी घडताना दाखविणे व पुढे कालांतराने दुय्यम घटनेबद्दल सामान्य भूमिकेमार्फत एखाद्या प्रवेशकासमान प्रवेशामधून माहिती सांगून अप्रत्यक्षपणे प्रधान घटनेच्या संदर्भात मोठ्या कौशल्याने सूचना देणे –हा प्रकारही बहुतांशी अवलंबिलेला दिसतो. किंबहुना, संस्कृत नाटककारांना असणाऱ्या अनेक घटनांना एकत्र बांधून अधूनमधून suspense (गूढता) निर्माण करण्याच्या ह्या हौसेमुळे संस्कृतनाट्यवाङ्मयाच्या परंपरेचेच हे एक वैशिष्ट्य होऊन बसले आहे असे म्हटल्यास ते अतिशयोक्त ठरू नये. ह्या प्रकाराला संस्कृतनाट्यपरीक्षकांनी unity of








action असे नाव दिले आहे. ते योग्य आहे काय ? unity of action म्हणजे काय ?

## कलावस्तूमध्ये एकात्मता निर्माण होणे महत्त्वाचे

कलावाङ्मयाच्या संदर्भात कलात्मतेच्या दृष्टीने पाहाता एकात्मतेच्या तत्त्वाला अत्यंत महत्त्व आहे, हे एकात्मतेचे तत्त्व वरवरचे नाही. ते कलावाङ्मयीन प्रत्येक व्यापारांना लागू आहे. कोणतीही कलाकृती ही कलावंताला आलेला एक अनुभव यथार्थपणे व निर्लेपपणे चित्रित करण्याच्या प्रयत्नामधून निर्माण होत असते. कारण त्या अनुभवामधून त्याला जीवनाची जी एक अनुभूती आली तिच्या निमित्ताने , त्यामधून त्याला जे एक जीवनसत्य जाणवले त्याचा व त्या निमित्ताने जीवनाचा अर्थ लावण्याच्या प्रयत्नामधून त्याच्या त्या अनुभवाचा त्या त्या कलामाध्यमामधून शोध घेण्याच्या प्रक्रियेमधून ती कलाकृती अवतरत असते. आणि म्हणूनच, त्या कलाकृतीमधील माध्यम, त्याचे सौंदर्य, तिची अभिव्यक्ती, तिची रीती, ह्या सर्व अंगांना तो अनुभव नियंत्रित करीत असतो. म्हणूनच, त्या कलाकृतीचे प्रत्येक अंग त्या एका अनुभवाचे एकात्मपणे चित्रण करून त्याचा एकात्म-एकसंध-केवळ परिणाम साधून त्यामधून व्यक्त होणाऱ्या एका जीवनसत्याचा एकात्मपणे साक्षात्कार घडविण्यासाठीच येत असते. हेच ते कलावाङ्मयातील एकात्मतेचे तत्त्व होय. जोपर्यंत ही एकात्मता नसेल तोपर्यंत माध्यम–त्याचे सौंदर्य, रीती– तिचे सौंदर्य, भाव वा विचारसौंदर्य किंबहुना कलावंताची कलात्म अलिप्तता ह्या कोणत्याही अंगांना कलात्मता प्राप्त होऊ शकत नाही– कलाकृती-पासून कलानंदाचा लाभ होऊ शकत नाही– म्हणजेच, कलाकृती ही कलाकृती होत नाही.

वाङ्मयामध्येही ह्या तत्त्वाला अर्थातच महत्त्व आहे. परंतु वाङ्मयप्रकारानुसार एकात्मता ज्या अंगामधून साधायची तो तपशील मात्र बदलताना दिसतो. उदा० : कवितेमध्ये शब्द, त्यांची अर्थपूर्णता, त्यांमागील अर्थांची व संवेदनांची वलये, त्यामधून निर्माण होणारी कल्पनाचित्रे, त्यामधून साकार होणारा एक अनुभव व त्यामधून येणारी एक प्रतीती असे हे रूप राहील. कथात्मवाङ्मयामध्ये, शिवाय, unity of time, unity of Place व unity of action ह्यांचाही अंतर्भाव करावा लागतो. ज्याठिकाणी नाटचपूर्ण कथा दृश्यकाव्य होते त्या नाटचाच्या बाबतीत तर ह्या एकात्मतेच्या तत्त्वांची विशेषच जाणीव होते. कारण नाटक हे अधिक वेचक : Selective ( of the details ) असते, व ते दृश्य असते. येथे भूमिका, प्रसंग, त्यांचे साक्षात् चित्रण, किंबहुना उच्चार, शब्द ह्या सर्वांचीच निवड अशा एका औचित्यबुद्धीने, अपरिहार्यतेने केलेली असते की प्रेक्षकांचे वा रसिकांचे ( वाचकांचे नव्हे ) मन विनाकारण कोठेही न जाता केवळ त्या एका अनुभवावरच केन्द्रित होईल, त्याच्या मनावर त्या केवळ अनुभवांचा एकात्म स्वरूपात एक ठसा उमटेल व अंती एका जीवनसत्याचा साक्षात्कार होईल. म्हणूनच प्रत्येक तपशील त्या अनन्यसाधारण अनुभवाच्या एकात्म परिणामाच्या दृष्टीने औचित्य-पूर्ण, अपरिहार्य व अर्थगर्भ असणे ह्याला अत्यंत महत्त्व आहे. हेच तत्त्व नाटचामध्ये नाटचवस्तूमध्ये केलेल्या बदलांनाही लागू आहे.

नाटकामधील प्रत्येक तपशील ( बदल व नव-निर्मितीही) हा अर्थपूर्ण असतो. म्हणूनच तो त्या अनन्यसाधारण अनुभवाच्या एकात्मपरिणामाच्या दृष्टीने सूचक असतो. परंतु ही सूचकता तपशीलाच्या Selection मुळे आलेली असते. ती गुणस्वरूप असते. कलात्म असते. अनुभवाच्या एका अंगावर प्रकाश टाकणारी म्हणून त्या अंगाची अर्थपूर्णता सूचित करणारी असते. ह्या सूचकतेचा व गूढतेचा ( suspense ) संबंध जोडण्याची आवश्यकता नाही.

हे विवेचन लक्षात घेऊन जर आपण ह्या बदल व निर्मितीच्या प्रकाराकडे आलो तर एक गोष्ट स्पष्ट-पणे दिसून येते. ती ही की, ह्या प्रकारच्या बदलांचा मूळ व्यक्तिमत्त्व, कथावस्तू अगर त्यामधून व्यक्त होणारा आशय (मग तो वेगळा, नवा, अनन्य-साधारण असला तरी–) ह्यांच्याशी फारसा निकटचा संबंध नसतोच. किंबहुना, एक कृत्रिम नाटचपूर्णता निर्माण करून, गूढता वाढवून नाटक अधिक 'आकर्षक' व 'मनोरंजक' करण्याच्या हेतूचीच बहुतांशी



अनुक्रमणिका

तीं परिणती असते. असे हे बदल व त्यान्वये निर्माण केलेली कृत्रिम 'नाटयपूर्णता' हे निश्चितपणे कल्पकतेचे व कारागिरीचेच फळ होय, कल्पनाशक्तीशी व्यक्तिमत्त्व वा कथावस्तू यांचा एक नवा व अधिक सखोल अर्थ लावण्याशी त्यांचा संबंध जवळजवळ नसतो. आणि कदाचित् म्हणूनच असामान्यांप्रमाणेच सामान्य कलावंतांनीही अशा प्रकारचे कल्पकतेचे कौशल्य अत्यंत आवडीने करून दाखविले असावे.

## काव्यात्मतेच्या दृष्टीने विचार

अशा ह्या बदलांचे हे स्वरूप लक्षांत घेता काव्यात्मतेच्या दृष्टीने त्यांचे स्थान काय असा एक प्रश्न आपोआपच निर्माण होतो. ह्यासाठी एक उदाहरण घेऊ : भवभूतीच्या उत्तररामचरिताचे. ह्या नाटकाच्या पहिल्या अंकात अनेक घटना एकाच वेळी-दिनी घडताना दाखविल्या आहेत. त्या क्रमवार (अ) १. रामाचा राज्याभिषेकसमारंभ नुकताच संपला आहे. २. रावणवधानंतर रामाची अयोध्येला पाठवणी करून त्याच्या राज्याभिषेकसमारंभासाठी अयोध्येत राहिलेले सुग्रीव, अंगद आदी नुकतेच स्वदेशी परतले आहेत.

३. राज्याभिषेक समारंभार्थ आलेल्या दशरथसुता शांता व जामात ऋष्यशृंग यांजबरोबर त्यांच्याकडील १२ वर्षे चालणाऱ्या यज्ञार्थ सर्व राजमाता, वसिष्ठ, अरुंधती आदी मंडळी ऋष्यशृंगाच्या आश्रमीं गेली आहे.

ह्या वरील घटना घडल्यापासून अगदी नजीकच्या काळात अनेक घटना एकाच दिवशी घडतात –

(ब) ४. सीता 'कठोरगर्भा असल्याचा उल्लेख. ५. ऋष्यशृंगाच्या घरून राजमातांचे क्षेमकुशल येणे ६. वसिष्ठांचा रामाला लोकाराधनाचा उपदेश. ७. कठोरगर्भा सीतेचे डोहाळे पुरविण्याबद्दल राजमातांचे प्रेमळ निरोप. ८. चित्रदर्शन ९. चित्रदर्शनाचे वेळी भागिरथीतीरी संचार करून उष्णोदकाने स्नान करण्याची सीतेने व्यक्त केलेली इच्छा. व तदनंतर क्षणभर विश्रांती.

१०. दुर्मुख ह्या हेराकडून लोकांच्या सीतेच्या संदर्भातील दोषारोपांची माहिती.

११. लगेच लक्ष्मणाकरवी रामाच्या अपरोक्ष सीतात्याग. १२. सीता वनात पोचल्यावर लक्ष्मणाची पाठ वळताच दुःख असह्य होऊन भागिरथीमध्ये उडी घेते. १३. त्याचदिवशी लवकुशांचा जन्म.

रामाचा प्रत्यक्ष राज्याभिषेकसमारंभ झाल्यावर लवकरच अ मधील घटना घडतात–तेथे समारंभ संपतो. कारण उत्तररामचरित्राच्या सुरुवातीला सूत्रधार जेव्हा नटाला 'आज वाद्यांचे सूर का ऐकू येत नाहीत' असे विचारतो तेव्हा तो सांगतो, "प्रेषिता हि इतः स्वगृहान् महाराजेन लङ्कासमरसुहृदो महात्मानः प्लवङ्गराक्षसाः सभाजनोपस्थायिनश्च नानादिगन्तपावना ब्रह्मर्षयो राजर्षयश्च, यदाराधनाय एतावतो दिवसान् उत्सव आसीत्।"

ह्या 'अ' मधील घटना घडल्यावर मोजक्याच दिवसात 'ब' मधील घटना घडतात. वास्तविक पाहाता ह्या अनेक घटना एकाच दिवशी घडताना दाखविण्यात तादृश हेतु फारसा दिसत नाही. ह्यामुळे पुढे छायानाम प्रवेशात त्याचदिवशी लवकुशांच्या जन्माला १२ वर्षे होत असल्याचा जो उल्लेख येतो त्यामधून अप्रत्यक्षपणे सीतात्याग व लवकुशजन्म ह्यांना १२ वर्षे झाली व ऋष्यशृंगाचे १२ वर्षाचे यज्ञसत्र संपले, एवढ्या सूचना देण्यापलिकडे ह्या घटनांचा समुच्चय काही कार्य करतो असे दिसत नाही. मग उत्तररामचरिताचे श्रेष्ठत्व ज्या छायानाम प्रवेशात व त्यामधून व्यक्त होणाऱ्या आशयात सामावलेले आहे त्याच्या परिणामाशी ह्यांचा संबंध आहे काय? ह्या प्रश्नाचे उत्तर देण्यापूर्वी रामसीतेची मने एकमेकांविषयी अधिक निर्मळ होण्यामध्ये ह्या घटना एकाच वेळी घडण्याची आवश्यकता आहे काय ह्या प्रश्नाचे उत्तर शोधणे आवश्यक आहे. आणि त्यासाठी ह्या घटना लागोपाठ घडण्यामुळे मनावर कोणता परिणाम करण्याचा प्रयत्न भवभूती करीत असावा हे तपासून पाहाणे आवश्यक आहे. त्यादृष्टीने ह्या घटना पाहिल्या असता एक विचार मनात येतो. सीतेच्या अग्निदिव्याला समक्ष साक्षी असतानाही राजा रामाने तडकाफडकी सीतात्याग करीत असताना आपल्या पत्नीवर अन्याय तर केला नाही ना असा एक प्रश्न सर्वसामान्यांना पडत असतो. असा प्रश्न विचारणारांच्या दृष्टीने रामाची सीतात्यागाची मागील भूमिका चोख व निखळ करण्याचा प्रयत्न भवभूती








येथे करीत असावा असे वाटते. तो परिणाम तो अशा-रीतीने घडवून आणतो :—

'अ' मधील १ व २ घटनांवरून व नटाच्या उद्गारांवरून रामाने राजसूत्रे अगदी नव्यानेच स्वीकारली आहेत—तो नवेपणा व्यक्त केला आहे.

'अ' ३—वडीलमंडळी व राजगुरू जवळ नाहीत म्हणन भांबावलेपणाची त्यात भर पडते.

'ब' ६— अशा स्थितीत वसिष्ठांचा 'त्वं बाल एवासि नवं च राज्यम्' ने सुरुवात करून लोकाराधनाचा व प्रजाजनांच्या रंजनाचा केलेला उपदेश दूताकरवीं येतो. येथे वाचकाचे, प्रेक्षकाचे मन तयार केले जाते. 'ब' १०—अशा स्थितीत प्रजाजनांच्या दोषारोपाची वार्ता येते.

म्हणून रामाने सीतात्यागाचा निर्णय तडकाफडकी घेतला.

रामायणातही राम सीतेची पंचवटीवासाची इच्छा पुढे घालूनच आपल्या असमक्ष, लक्ष्मणाबरोबर तिची रवानगी करतो. येथे ते परिणामकारक करण्यासाठी सीता कठोरगर्भा दाखविली. व ७— तिचे डोहाळे पुरविण्याबद्दल राजमातांचे प्रेमळ उपदेश आणले—पार्श्वभूमी तयार केली. समारंभानंतर आलेला उदासवाणेपणा घालविण्यासाठी चित्रदर्शन आणले व त्यामधून पंचवटीवासाच्या इच्छेला निमित्त तयार केले. मग 'ब' ९— सीतेने इच्छा व्यक्त केली. ही दुसरी पार्श्वभूमी. मग ही इच्छा व डोहाळे पुरविण्याचे निमित्त ह्यांची सांगड घालून वसिष्ठांच्या उपदेशाच्या पार्श्वभूमीवर आपल्या असमक्ष, सीतेसाठी व प्रेक्षकांसाठी तात्पुरती शंकेला जागा न ठेवता लक्ष्मणाबरोबर रवानगी केली.

येथे ही सांगड घालताना शंकेला जागा राहात नाही म्हणून "घटनांमधील अपरिहार्यता पटवून नाटकाच्या कलात्मतेत भर घातली" असे उद्गार काही टीकाकार काढतात. परंतु शंका निर्माण न होण्यातच कलात्मतेचे श्रेष्ठत्व असते असे नाही. तर शंका निर्माण होऊन त्या फेडून घेण्यासाठी रसिकाला अंतर्मुख व्हायला लावणे व त्या वास्तवामधील ते वातावरण त्या वातावरणामधील त्या व्यक्ती, त्यांच्या चित्रणामधून प्रस्थापित केलेले त्यांचे व्यक्तित्व ह्यांच्या आधारे आत्मचिंतनामधून सुसंगतपणे, स्वयंपूर्णरीतीने त्यांना अपरिहार्य असे उत्तर अप्रत्यक्षपणे, आपोआपच मिळणे ह्यातही कलात्मता आहे— आणि ती अर्थगर्भही आहे. ह्याच त्या व्यक्तिमत्त्वाबद्दल, जीवनाबद्दल व श्रेष्ठ मूल्यांबद्दल विचार करायला लावणाऱ्या रामायणातील सूचक अध्याहृत जागा होत! आणि ह्यातच रामायण-महाभारताचे वैशिष्ट्य आणि महाकाव्य म्हणून असणारे मोठेपण सामावलेले आहे.

ह्या अध्याहृत जागा भरण्यात वावगे काहीच नाही. परंतु त्या भरत असताना तोल जाता कामा नये. म्हणजेच, ते वास्तव व त्यामधील व्यक्ती ज्या मूल्यांच्या दर्शनार्थ निर्माण झाल्या त्यांना धक्का न लावणे हे लेखकाचे आद्य कर्तव्य होय. परंतु चित्रदर्शनाचे वेळी पंचवटीवासाची इच्छा कठोरगर्भा सीतेच्या तोंडी घालून भवभूती सीतेला जशी काही प्रमाणात सामान्यांच्या पातळीला आणतो त्याचप्रमाणे रामाच्या निर्णयाची परिणामकारकता वाढवीत असताना व त्यामागील कारणमीमांसा अधिक 'संपूर्ण' करीत असताना भवभूती रामाच्या कृतींचे समर्थन तर करीत नाही ना अशी शंका आल्याशिवाय राहात नाही. जीवनात महाराजा होण्यापूर्वी— वल्कले धारण करताना व वनवासी जीवनातही— आदर्श, कर्तव्यकठोर भूमिका पार पाडणाऱ्या रामाच्या व्यक्तिमत्त्वास कलावंताच्या वा वाचकाच्या सहानुभूतीची अपेक्षा वा आवश्यकता नाही. आणि, परिणामकारकता वाढविण्याच्या निमित्ताने रामाच्या निर्णयाचे व तत्प्रसंगीच्या भूमिकेचे समर्थन करायला लागल्याबरोबर रामाची भूमिका नाही म्हटले तरी केविलवाणी भासू लागते – हा रामायणातील राम नव्हे. आणि म्हणूनच, सामान्यांच्या दृष्टीने निर्माण होणाऱ्या प्रश्नांचे निराकरण करण्यासाठी ह्या घटना एकाचवेळी घडताना दाखविण्याने काहीजणांना अपरिहार्यतेचा साक्षात्कार (!) होत असेल, परंतु त्याला वरील कारणासाठी गुणस्वरूप मानता येणार नाही. म्हणजेच, उत्तररामचरिताच्या काव्यात्मतेत त्यामुळें भर पडते असे म्हणता येणार नाही. किंबहुना, राम व सीता यांची परस्परांविषयीची संशयनिवृत्ती करणे ह्यासाठी जे नाटक लिहिले त्याच्याशी सुद्धा ह्यांचा आशयदृष्टचा तादृश अर्थपूर्ण संबंध आहे असे म्हणता








येणार नाही. आणि म्हणूनच, ह्या बदलांमधून एकत्र घडवून आणलेल्या ह्या घटनांना संस्कृतनाटच-टीकाकारांनी "Unity of action असे नाव दिलेले असले तरी Unity of action च्या तत्त्वाशी वा त्या नाटकातील आशयाच्या एकात्म परिणामाशी त्यांचा अपरिहार्य, अर्थपूर्ण असा संबंध असल्याचे कोठेही जाणवत नाही, असेच म्हणावे लागते. म्हणजेच, ह्या नाटकातील नाटचामध्ये भर घालण्यापेक्षा एक कृत्रिम नाटचाभास निर्माण करणे व त्या साहाय्याने मनोरंजकतेत भर घालणारी एक चमत्कृतीपूर्ण गूढता निर्माण करणे ह्या पलिकडे नाटचात्मतेत वा काव्यात्मतेत भर घालण्याचे कार्य ह्यामुळे घडत नाही. मग ह्याला नांव काय द्यायचे ? द्यायचेच तर अशा प्रकाराला collection of actions असे एक नाव देता येईल.

मग अशा ह्या कल्पनाचमत्कृतीचे काव्यात्मतेच्या दृष्टीने स्थान काय ?

अर्थात्, ज्याचा आशयाशी अर्थव्यक्ती व सौंदर्य-निर्मितीच्या दृष्टीने कलात्म संबंध नाही त्याला 'काव्यात्म' वा 'नाटचपूर्ण' म्हणता येणार नाही. त्याला काव्याभास वा नाटचाभास असेच म्हणावे लागेल.

मग अशा अंगाचे कौतुक कोठवर करावे ?

जे स्थान काव्यामध्ये प्रदर्शनात्मक अलंकारांचे, चमत्कृतीचे व चमत्कृतीजन्य नावीन्याचे, तेच स्थान अशा ह्या Collection of action चे, त्यामधून निर्माण होणाऱ्या नाटचाभासाचे व त्या आधारे निर्माण केलेल्या Suspense ( गूढतेचे ) होय. यामुळे नाटचात्मतेत, वा काव्यात्मतेत भर पडत नसली तरी जोपर्यंत नाटकातील प्रमुख नाटच व त्यामधून व्यक्त होणारा आशय यांना ढळ पोचत नाही तोपर्यंत त्यांना कौतुकास्पद मानावयास हरकत नसावी.

## उत्तररामचरित्र आणि महावीरचरित्

ह्या दृष्टीने उत्तररामचरिताच्या प्रारंभी येणाऱ्या Collection of action चे कितपत कौतुक करावे ? ह्यासाठी उत्तररामचरिताच्या प्रारंभाच्या संदर्भात महावीरचरित्राचा शेवट लक्षात घेणे आवश्यक ठरते. कारण भवभूतीने महावीरचरित व उत्तर-रामचरित ह्या दोन नाटकांमधून सवंध रामकथा गुंफली आहे ; व जेथे महावीरचरित् थांबते तेथे तेच कथासूत्र उचलून उत्तररामचरित सुरू होते.

येथे कोणी असा एक आक्षेप घेतील की ही दोन नाटके स्वतंत्र आहेत. तेव्हा त्यांचे स्वतंत्रपणे परिशीलन करावे. अर्थात ते जरी शक्य असले तरी उत्तररामचरिताचे स्वरूपच असे आहे की त्याच्या प्रारंभीच्या काही बदलांमधून घडवून आणलेल्या Collection of action चे मूल्यमापन करावयाचे झाल्यास महावीरचरित्राच्या शेवटाकडे जाणे अपरिहार्य ठरते.

उत्तररामचरित हे नाटक राम व सीता ह्यांच्या परस्परांबद्दलच्या संशयनिवृत्तीसाठी लिहिले आहे. त्यासाठी नाटकाच्या प्रारंभीही भवभतीने काही बदल घडवून आणले. त्यापैकी महत्त्वाचा बदल म्हणजे येथे सीता कठोरगर्भा आहे. रामायणात ती त्यागाचे वेळी कठोरगर्भा नाही. अर्थात हा बदलही भवभूतीने जाणीवपूर्वक हेतुपूर्वक परिणामकारकता वाढविण्या-साठीच केला आहे. तो कितपत उचित आहे ? तो उत्तररामचरिताच्या आशयाशी सुसंगत आहे काय ? ह्या प्रश्नांचा विचार करणे अपरिहार्य ठरते. व त्यासाठी महावीरचरिताचा शेवट पाहाणे आवश्यक ठरते.

त्यादृष्टीने महावीरचरिताच्या शेवटील काही महत्त्वाच्या घटना :–

सहाव्या अंकाचे शेवटी रावणाचा वध झाल्यावर सातव्या अंकात राम लंकेचा ताबा घेतो व प्रथम सीतेला अशोकवनातून मुक्त करून आपल्यासमोर आणतो. व सर्वांसमक्ष तिला सांगतो, ' तू राक्षसगृही वास केला असल्यामुळे ह्यापुढे कोठेही जावयास मुक्त आहेस ' तेव्हा पतीने टाकल्यावर अग्नि-प्रवेशाशिवाय अन्य मार्ग नाही म्हणून सीता अग्नि-प्रवेश करते. परंतु ती पवित्र व पतिव्रता असल्याचा निर्वाळा देऊन स्वतः अग्नी रामाला सीता अर्पण करतो. त्यानंतर लगेच राम एकमेव पौलस्त्य (अंक ७ – विष्कंभक) : विभीषणाला राज्याभिषेक करतो व विभीषणाने त्याला अर्पण केलेल्या कुबेराच्या पुष्पक विमानातून अयोध्येला जावयास निघतो.

सुग्रीव वायुसुत हनुमानाला रामाच्या आगमनाचे वृत्त कळविण्यासाठी भरताकडे पाठवून देतो. व पाठोपाठ विभीषण, सुग्रीव, अंगद आदी रामाची पाठवणी करण्यासाठी त्याच्यावरोबरच अयोध्येला यावयास निघतात. जात असता लक्ष्मण वनवासाची चौदा वर्षे त्याच दिवशी संपत असल्याचे वृत्त सीतेला कथन करतो. अत्यंत वेगाने जाणाऱ्या पुष्पक विमानाने अयोध्येला येत असता वाटेत ऋषिमुनींना वंदन करीत करीत सह्य पर्वतापर्यंत येतात. हा पर्वत अत्यंत उंच. तरीही विमान वळसा न घेता पर्वत पार करतात. कारण रामाला अयोध्येची ओढ लागलेली आहे. विमान हिमालयाजवळ विश्वामित्राच्या तपोभूमीजवळ येते. तेव्हा राम तेथे उतरण्याच्या विचारात असतो. परंतु विश्वामित्र त्याला आज्ञा करितात की 'आधीच वेळ झालेली आहे तेव्हा तू सरळ अयोध्येला जा. वसिष्ठ व अरुंधती तेथे तुझी वाट पाहात आहेत. मीही तुझ्या पाठोपाठ येतो.' तेव्हा राम लंकेपासून अयोध्येपर्यंत न थांबता पुष्पक विमानातून येऊन पोहोचतो. तेथे सर्व राजमाता, राजगुरु, ऋषिमुनी, भरत आदी भ्राते त्याची वाटच पाहात असतात. तसेच भरताने त्याच्या राज्याभिषेकाची तयारीही केलेली असते. तोच विश्वामित्रही येतात व राज्याभिषेक समारंभाची द्वाही फिरते. समारंभ लगेच पार पडतो व विभीषणादिकांना स्वदेशी परत जाण्याला आज्ञाही विश्वामित्र देववितो. येथे रंगभूमीच्या सोईसाठी रामाचे अयोध्येत आगमन, राज्याभिषेक समारंभ व विभीषणादिकांना परतण्याची आज्ञा ह्या घटना एकापाठोपाठ एक आणलेल्या असल्या तरी 'नव्याने मिळविलेल्या राज्याची व्यवस्था पाहण्यासाठी लवकर परतावे' असा उल्लेख आहे. त्याअर्थी ह्या घटनांमध्ये फारसा काळ जात नाही. ह्याची अप्रत्यक्षपणे भवभूती सूचनाच देत असतो. येथे महावीरचरित् संपते व तेथेच—म्हणजे राज्याभिषेकसमारंभ नुकताच संपला आहे व विभीषणादी नुकतेच परतले आहेत अशावेळी उत्तररामचरिताची सुरुवात होते. व तेथेच भवभूती सीतेला कठोरगर्भा दाखवितो व त्याचदिवशी तिचा त्याग व लवकुशांचा जन्म ह्या घटना नाटकाच्या प्रारंभीच्या हेतुपूर्वक बदलांमधून घडवून आणलेल्या Collection of action मधून घडवून आणतो.

ह्या सर्व भराभर एकामागोमाग वेगाने घडणाऱ्या घटना व त्यांना व्यापणारा काळ पाहिला तर तो निःसंशय कमी अधिकात अधिक : २।३ महिने आहे. आणि हे सूत्र लक्षात घेतले, त्यामधून सूचित होणारा काळ लक्षात घेतला म्हणजे मग उत्तररामचरितातील आशयाच्या व नाटकाच्या अंतिम परिणामाच्या संदर्भात प्रारंभींच्या Collection of action मुळे कशी एक विसंगती निर्माण होते ते सहजच लक्षात येईल. मध्यंतरी अत्यल्प अवधी गेलेला असताना सीता कठोरगर्भा कशी असा प्रश्न लगेच उभा राहतो.

आणि म्हणूनच उत्तररामचरित हे एक सर्वांगपरिपूर्ण नाटक आहे असे मतप्रदर्शन करून त्या नाटकाच्या प्रारंभी चमत्कृतिपूर्ण रीतीने जवळ आणलेल्या घटनांना Unity of action मानून त्यासाठी भवभूतीला मोठा मानणे हे रसिकतेच्या दृष्टीने बरोबर होणार नाही. खरोखरच गुणस्वरूप असणाऱ्या छायानामप्रवेशावर व त्यामधून व्यक्त होणाऱ्या आशयावर लक्ष केन्द्रित करीत असताना इतर अनेक घटनांकडे भवभूतीचे दुर्लक्ष होते, किंबहुना तोसुद्धा संस्कृत नाटकांच्या काही अर्थहीन परंपरांना बळी पडतो हे मानले पाहिजे आणि अशा चमत्कृतींचे कौतुकही थोडे कमी केले तर अधिकच बरे!

अर्थात् अशा प्रकारचे सर्वच बदल आशयाला धक्का लावणारे असतात असे नाही. परंतु काव्यात्मतेच्या दृष्टीने त्यांचे महत्त्व मात्र निःसंशय मर्यादितच मानावे लागेल.

---



अनुक्रमणिका

प्रा. भाऊ मांडवकर

# कवी शिवराम किंकर

शिवराम किंकर ह्या कवीची फारच कमी माहिती उपलब्ध आहे. डॉ. य. खु. देशपांडे यानी या कवीबद्दल दिलेली माहितीही अल्प असून 'महाराष्ट्र सारस्वता'च्या पुरवणीत त्याच माहितीची पुनरुक्ती करण्यात आली आहे.[१] शिवराम किंकराने लिहिलेल्या 'गोपिकास्वयंवरा'ची व त्या अनुषंगाने ग्रंथकर्त्याची माहिती देताना डॉ. य. खु. देशपांडे यानी लिहिले आहे.– "हा गोपिकास्वयंवर ग्रंथ ओवीबद्ध ४० अध्याय असून अपूर्ण आहे. तो श्रीशारंगधर मुनीचा शिष्य शिवराम किंकर याने केला आहे. काल निश्चित मिळाला नाही. मात्र भाषेच्या घाटणीवरून १७व्या अथवा १८व्या शतकातील असावा. अध्यायाच्या शेवटी 'इति श्रीभागवते महापुराणे दशमस्कंद कथाकल्पतरु हरीवंश संमत उपेंद्रचरीता गोपीकास्वयंवर' असे लिहिले आहे. या ग्रंथाचा दहावा अध्याय 'विजन महात्म्य' म्हणून म. भक्तराजबाबा औरंगाबादकर यानी शके १८३३ साली छापविला.[२]"

## नवीन माहिती उजेडात आली

डॉ. य. खु. देशपांडे यांना 'गोपिकास्वयंवरा'ची अपूर्ण प्रत उपलब्ध झाल्यामुळे त्यांची या ग्रंथाच्या कर्त्याचाही माहिती अपूर्ण राहणे साहजिक आहे. आता या कवीसंबंधी नवी माहिती साधार उपलब्ध होण्यास अडचणी नाहीत. कारण 'गोपिकास्वयंवरा'च्या पूर्ण प्रता अमरावती, ऋद्धिपूर, माहूर येथील मठांमधून उपलब्ध होऊ शकतात. अशीच एक पूर्ण प्रत मला मिळाली असून ती मिळवून देण्याच्या कामी श्री. चंद्रकांत निंभोरकर, संपादक 'महानुभाव' मासिक अमरावती यानी मला मदत केली. 'गोपिकास्वयंवरा'चे संपादन व समीक्षण करताना आणखी अन्य प्रतींचा उपयोग होऊ शकेल. तूर्त या लेखात फक्त कवीची माहिती घेण्याची करून दृष्टी असल्यामुळे मला उपलब्ध झालेल्या प्रतीच्याच आधारांवर भर दिला आहे.

## 'गोपिका स्वयंवर' काव्याची हस्तलिखित प्रत

'गोपिकास्वयंवर' हे काव्य अपूर्ण नसून ते पूर्ण स्थितीत उपलब्ध आहे. मला मिळालेली प्रत फारशी जुनी दिसत नाही. कारण ती उत्तम स्थितीत व व्यवस्थित आहे. 'यवते सुक्रेश्वर' येथे 'पंज्याबी रंगोबा दादा सुंदर' यांच्या (हस्ताक्षरातील ?) मालकीचा हा ग्रंथ असल्याची शेवटी नोंद आहे. या ग्रंथाचा एक अध्याय छापला आहे. परंतु या पूर्ण ग्रंथाच्या छपाईचीच व्यवस्था करण्यात आली असावी व त्याच दृष्टीने ही प्रत हाताने लिहून काढली असावी. कारण या प्रतीच्या प्रारंभीच लिहिलेले आहे—

"ही पोथी मुंबईत बापू सदासीव सेटे यांचे छा० सीलयेंत्रे छा०" "कींमत रूपै आठ" "पेठ बुधवर बाजार."

या मजकुरावरून ही प्रत शिळा–छापखान्याच्या काळात झाली हे निश्चित दिसते.

सदर्हू प्रतीत प्रत्येक अध्यायाच्या आरंभी काढलेली चित्रे वैशिष्ट्यपूर्ण असून त्या चित्रांना अध्यायातील मजकुरांचे संदर्भ आहेत.

## नऊ हजार सोळा ओव्यांचा ग्रंथ

'गोपिका–स्वयंवर' हा ग्रंथ ४० अध्यायांचा असून एकूण ओवीसंख्या नऊ हजार सोळा आहे. भाषा प्रवाही आहे आणि पूर्ण ग्रंथात श्रीकृष्णाच्या विविध विवाहांची रसभरित वर्णने आली आहेत. प्रत्येक अध्यायाच्या शेवटी कवीने स्वनामाची टीप टाकली आहे शेवटच्या अध्यायात प्रत्येक अध्यायाचा क्रमशः सारांश दिला असून कवीने त्या ओघातच आपली माहिती दिली आहे.

## जन्मग्राम पुसद तालुक्यात !

शिवराम किंकर या कवीचा जन्म क्षत्रिय वंशात झाला. महानुभाव आणि दत्त या पंथांचे पूज्य स्थान जे माहूर क्षेत्र, त्याच्या पश्चिमेस यवतमाळ जिल्ह्यातील पुसद तालुक्यात वेणी नावाचे गाव आहे माहूरच्या पश्चिमेस ठीक अकरा कोसावर हे गाव वसले आहे. गावाची वस्ती एका उंचशा डोंगरावर असून त्या उंचवट्याला कवीने 'मृगेंद्राचळ' असे संबोधिले आहे. या वेणी गावाची 'मुकद्दमी' परंपरेने शिवराम किंकराच्या घराण्यात चालू होती. कवीचे आडनाव

१. महाराष्ट्र सारस्वत ( पुरवणी : शं. गो. तुळपुळे, चौथी आवृत्ती ) पृ. १०१२
२. डॉ. य. खु. देशपांडे; महानुभावीय मराठी वाङ्मय : १ ली आवृत्ती पृ. ८४



अनुक्रमणिका

'मसके' असून त्याच्या पूर्वजांचा त्या भागात चांगला बोलबाला होता.

पुसद तालुक्यातील नाथपंथी कवी विठ्ठल किंकर व महानुभाव कवी शिवराम किंकर यांचा संबंध दिसत नाही.

## पुसदची कवीने दिलेली वेगळी माहिती

पुसदच्या परिसरात राहत असल्यामुळे शिवराम किंकराने पुसदची थोडी प्राचीन माहिती आपल्या ग्रंथात दिली आहे. पुसद तसे प्राचीन नगर आहेच. शिवराम किंकराच्या कथनानुसार पुसद ही द्वापार-युगीची 'मंद्रपुरी' आहे. 'मंद्रपुरी'त बृहत्साम्न' नावाचा 'कोदंडधारी' राहत होता. 'तयाची कुमरी लक्षेमणा (लक्ष्मणा)' ही असून तो 'श्रीकृष्णाचा मुखे (मुख्य) स्वसुर (सासरा)' होता. 'तयाचा देस तयाचे णगर' पुसद असल्याची माहिती शिवराम किंकर मोठ्या विश्वासाने देतो.

शिवराम किंकराला 'गोपिकास्वयंवर' रचण्याची फूर्ती होण्यासाठी श्रीकृष्णाचे पुसदशी असलेले हे जवळचे नाते काही अंशी कारणीभूत झाले असणारच! माहूरच्या निकटत्वामुळे महानुभाव पंथ व श्रीदत्त यांची जवळीक निर्माण होणे हे जसे शक्य; तद्वतच महानुभाव पंथातील पंचकृष्णापैकी श्रीकृष्ण व त्याचे आत्मीय पुसद हेही जवळिकेला कारण संभवते!

## घराण्याला बारा गावांची 'मुकद्दमी'

शिवराम किंकराच्या घराण्याला 'मुकद्दमी'ची बारा गावे पारंपरिक 'वृत्ती' म्हणून मिळालेली होती. त्यात 'बोरज' हे गाव मुख्य 'नायकक्षत्र' होते. यांच्या वंशात 'भुमटपण' (?) परंपरेने चालू होते. 'मुकद्दमी' ही काही सैनिकांच्या तुकडी-प्रमुखाला मिळत असे. 'भुमटपण' म्हणजे सणवारप्रसंगी गावात पत्रावळी'ची पाने वगैरे वाटण्याचे काम करणाऱ्या 'भूमक' लोकांचे तर काम नव्हेना? की, या शब्दाचा संबंध भूमीशी आहे?

## गृहकलह व त्याचे परिणाम

या घराण्याला मिळालेल्या पारंपरिक वतनांमुळे संपत्ती व संतती यास बहर आला! 'पुत्रकळत्र' फार वाढले. त्यातूनच अपरिहार्यपणे श्रीमंतीची रग गोत्रसंहारास कारण झाली. युद्धे झाली. आपसात यादवी माजली. फक्त 'साख' या गावाची 'मुकद्दमी' तेवढी उरली!

शिवराम किंकराच्या आजोबाला (पित्याच्या पित्याला) नात्यातीलच माणसाने चेटूक केले व तो 'पिशाच्च' झाला. घराचा कर्ता पुरुष पिसाट असल्यामुळे घराचे स्थैर्य विघटित झाले. त्यामुळे गोत्रात वा नात्यातच फूट पडली 'वृत्ती'च्या वाटण्या करण्यात आल्या. याप्रमाणे गावातील मानवाईकपणा ओसरला व 'भुमट चाली स्तब्द जाली' म्हणजे घराण्यात परंपरेने चालू असलेले 'भुमटपण' बंद झाले!

## ब्रह्मयोगिनी माता

सदाशिव हे शिवराम किंकराच्या घराण्याचे दैवत होते. तरीपण, कवीला सर्व देवतांचे बीज 'कृष्णनाथ'च वाटतो. या कवीच्या पित्याला प्रारंभी एकच मुलगा होता. त्यामुळेच कदाचित शिवरामाच्या पित्याला दोन बायका झाल्या असाव्या. शिवरामाच्या पित्याचे नाव 'पंचानन' असे असावे. शिवरामाची आई ही त्याच्या पित्याची ज्येष्ठ पत्नी होती. परंतु कनिष्ठ पत्नीच त्याच्या वडिलाला अधिक प्रिय असल्यामुळे शिवरामाच्या आईने गृहत्याग केला व ती 'ब्रह्म-योगिनी' झाली. बहुतेक जवळच्या मातापूरला म्हणजे माहूरला जाऊन तिने महानुभाव पंथाची दीक्षा घेतली असावी.

## बापाच्या बहिणीने पालनपोषण केले

आई सोडून गेल्यामुळे लहानगा शिवराम पोरका झाला. साहजिकच त्याच्या पित्याने त्याच्यावर अधिक प्रेम करावयास सुरुवात केली. परंतु त्याच्या सावत्र आईला ते न पटल्यामुळे वडिलालाही पुत्रप्रेमाला आवर घालावा लागला. सावत्र आई शिवरामाचा द्वेष करी. त्यातच तिला मूल झाले. त्यामुळे शिवरामाच्या जीवनात उन्हाळा उभा झाला. स्नेहाच्या अभावी जगणाऱ्या शिवरामला त्याच्या आतेचा आसरा लाभला. वडिलाच्या बहिणीने त्याला प्रेमाने वाढविले व वस्त्रा-भरणे दिली.

## "आपणासारिखे करिती तात्काळ!"

काही वर्षे निघून गेली. त्यानंतर सहज तीर्थाटनाला म्हणून शिवरामाची 'ब्रह्मयोगिनी माता' त्याच गावात आली. मुलाची दुरवस्था तिला पाहवली नाही आणि म्हणून ती शिवरामाला आपल्याबरोबर घेऊन गेली. मुलालाही तिनेच महानुभाव पंथाची दीक्षा देवविली असावी. अध्यात्माची अधिकारी ठरलेली माता स्वतःच्या मुलालाही तोच मार्ग दाखविते, याबद्दलचे हे उदाहरण वाखाणण्याजोगे आहे.








## गुरु सारंगधर

शिवरामाला संन्यासदीक्षा श्रीसारंगधर यांनी दिली. श्रीगुरुराज सारंगधर ही व्यक्ती शिवरामाला धीर आणि आधार देणारी वाटली. भक्ती आणि वैराग्य यात आपले गुरू आगळे असल्याची माहिती शिवराम देतो. त्याने गुरूला 'ज्ञानपुतळा', 'तपसागर', 'सत्वशांतीदयासागर', 'उदार कल्पतरू', 'दामिणी-समरीचा वैश्वानर' इत्यादि विविध विशेषणे दिलेली आहेत. शिवरामाच्या वर्णनावरून, श्रीसारंगधर गुरु देहयष्टीने भव्य असावेत, असे दिसते.

## शिवरामाचे अन्य गुरू

दीक्षा घेतल्यानंतर तिसऱ्याच वर्षी दुर्दैवाने शिवरामाचे 'गुरुनिधान गुप्त झाले.' गुरुवियोगात बराचसा काळ कवीने घालविला. उद्योग वा विद्याभ्यास न करता तो भटकला.

योग असा की, कवीच्या भाग्याने त्याचा स्वतःचा चुलताच त्या नंतर कवीला ज्ञानपंथ दाखविणारा ठरला! त्याने अत्यंत प्रीतीने शिवरामाकडून विद्याभ्यास करविला. परंतु तोही लवकरच सोडून गेला, हे आणखी एक दुर्दैव!

त्यानंतर शिवरामाला त्यांच्या कुळातील आचार्य हरिराज यानी ज्ञानामृत प्रदान केले. या व्यक्तीचे शिवरामाने 'योगियामाजी ज्ञानसूर्य', 'ज्ञानमूर्ती' अशा शब्दात वर्णन केले आहे. तसेच, मातेप्रमाणे वागून आपल्या सर्व अपेक्षा पुरविल्या, असेही कवीने आचार्य हरीराजासंबंधी लिहिले आहे.

एकंदरीत, आईसकट चार गुरूंचा सहवास शिवराम किंकराला लाभला. साहजिकच त्यांच्या ज्ञानाचा व त्यागी-तपी जीवनाचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीने त्यास लाभ झाला. आणि त्याचेच फलित म्हणजे 'गोपिकास्वयंवरा'ची नीटस रचना होय, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

## कवीचा काळ

कवी शिवराम किंकर सतराव्या किंवा अठराव्या शतकात होऊन गेला, असे डॉ. य. खु. देशपांडे यांचे पूर्वोक्त कथन आहे. 'गोपिकास्वयंवरात शेवटी शार्दूलविक्रीडित वृत्तातील एक श्लोक आहे. ओवीसह ग्रंथात श्लोक गुंफण्याची कवीने स्वतःच कबुली दिली आहे. ती खरी असल्यास 'गोपिकास्वयंवरा'च्या शेवटचा श्लोक शिवराम किंकराचाच आहे असे मानावे लागेल. तसा तो मानल्यास शके १७६८ मधील 'गोपिकास्वयंवरा'ची रचना आहे, असे दिसते "स्याके भूमुनि याम पर्वत, म्हणजे शके १७८८, असे सकृद्दर्शनी वाटते (भू=१; मुनि-७; याम८; पर्वत ८) परंतु या गणनेत चूक होते उलट्या बाजूने येथे मोजण्याची गरज दिसत नाही. सरळच गणन केले पाहिजे याम म्हणजे प्रहर आठ ऐवजी सहा धरावे कारण आता १२ तासांचे ४ प्रहर होत असले आणि तीन तासांचा प्रहर मानण्यात येत असला तरी पूर्वी चार तासांचा प्रहर मानला जाई. या हिशेबाने पूर्ण दिवसाचे सहाच प्रहर होतात. म्हणून वरील श्लोकातील शक १७६८ हाच ग्राह्य होय. या श्लोकाच्या पहिल्याच ओळीत 'पराभावे मिती वत्सरे' असे उत्तरार्धात म्हटले आहे. म्हणजे या वर्षी पराभव नामकसंवत्सर चालू होता. पराभव संवत्सर शके १८८८ साली म्हणजे चालू वर्षी (इ. स. १९६६ मध्ये) सुरू आहे. हाच शक १७६८ साली येतो. तो शके १७८८ मध्ये येत नाही. म्हणून या ग्रंथाची रचना शके १७६८ मध्ये झाली असावी असे दिसते. आश्विन शुद्ध प्रथमेला घटस्थापनेच्या दिवशी ही रचना झाली असेही ह्याच श्लोकावरून दिसते.

हा श्लोक जर हस्तलिखित तयार करणाऱ्याचा असेल तर शिवराम किंकराचा काळ त्याहीपूर्वीचा ठरू शकतो. पण पोथीत त्याला अन्य पुरावा नाही. परंतु जोपर्यंत हा श्लोक शिवराम कवीव्यतिरिक्त अन्य कुणाचा असल्याचे निश्चित कळत नाही तोवर तो कवीचाच आहे हे सत्य मानले पाहिजे. आणि जर ते सत्य मानले तर कवीचा काळ शकदृष्ट्या अठराव्या शतकातील निश्चित होतो!

जर हा ग्रंथ १७६८ शकातील असेल तर तो शिळाछापाच्या मुद्रणकाळातच लिहिला गेला असा अर्थ होतो. इ. स. १८४० मध्ये हा शक येतो. या काळात शिळाछाप मुद्रणाची व्यवस्था होती. मला मिळालेल्या प्रतीवर एतद्विषयक जो उल्लेख आहे त्याला या दृष्टीने अर्थ येतो. इ. स. १८४० मध्ये शिवराम किंकर कवी हयात असल्याचे फलित होते आणि तसे असल्यास हा कवी फारसा प्राचीन ठरत नाही!












प्रा. वसंत स. जोशी

## तंजावरस्थ कवि शेषकृत -

# भावार्थ रामायणाचे चौथे अज्ञात उत्तरकांड

### उत्तरकांड रचनेचे प्रयत्न

संतकवी श्री एकनाथ यांची ' भावार्थ-रामायण ' ही वैभवशाली साहित्यकृती आहे. या ग्रंथरचनेने त्यानी प्राचीन मराठी साहित्यात मोलाची भर टाकली आणि मराठीचे महाकाव्यसदृश रचना करण्याचे सामर्थ्य सिद्ध केले. या ग्रंथाने जनमानसातसुद्धा मानाचे स्थान पटकाविलेले आहे. अनेक ठिकाणी या ग्रंथाची पारायणे होत असतात. ' लक्ष्मण शक्ती 'चा सोहळा साजरा केला जातो. या रामायणाचे वाचन होत असताना ही माणसे जणू रामायणकालीन जीवन जगत असतात. या ' भावार्थ रामायणा'ची छाप श्रीधरासारख्या कवीवरही मोठया प्रमाणात पडली आहे. या ग्रंथाची आवड तत्कालीन रसिकात मोठी होती. याचे साक्षेपाने वाचन करणाऱ्या जयरामसुतासारख्या कवीला ' भावार्थ रामायणा'त ' अहिरावणाख्यान ' नाही हे पाहून आश्चर्य वाटले आणि तो कथाभाग त्याने स्वतः लिहून त्या कृतीत घातला. मात्र अशा तऱ्हेने ग्रंथपूर्ती करीत असताना त्याने एकनाथांची बूज राखलेली आहे. " एकनाथांसारखा कवि हे आख्यान लिहिण्यास विसरला असेल असे वाटत नाही. बहुत काळ ग्रंथ हाताळीत असताना हा अध्याय गहाळ झाला असावा " असेच सौजन्यशाली उद्‌गार त्याने काढले आहेत. एकनाथांच्या ' भावार्थ रामायणातील न आढळणारा अहिरावणाख्यानाचा भाग लिहून काढण्यांची इच्छा जशी जयरामसुतासारख्या कवीला झाली, त्याचप्रमाणे त्यांनी न रचलेले ' उत्तरकांड ' लिहून त्याला पूर्णता आणण्याचा प्रयत्न एकनाथांच्या अनेक चाहत्यांकडून झालेला आढळतो. प्रचलित आख्यायिकेप्रमाणे एकनाथांचा शिष्य गावबा याने लिहिलेले उत्तरकांड ' छापील भावार्थ रामायणासमवेत आज कित्येक वर्षे मराठी वाचकांसमोर आहे. एकनाथांचा नातू सुप्रसिद्ध कवि मुक्तेश्वर याने लिहिलेले ' उत्तरकांड ' मी प्रकाशात आणले असून ते पुण्याच्या 'व्हीनस प्रकाशना'-तर्फे प्रसिद्धही झाले आहे. एका अनाम कवीचे अपूर्ण स्वरूपातील परंतु 'एका जनार्दना शरण ' ही मुद्रिका असणारे ' उत्तरकांड ' प्रा. पां. ना. कुलकर्णी यांना उपलब्ध झालेले आहे. आज अशाच तऱ्हेने एकनाथांच्या लोकप्रिय ग्रंथाची पूर्तता करणारे तंजावर भागातील कवीचे अप्रकाशित व अप्रसिद्ध असे चौथे उत्तरकांड ' मराठी वाचकासमोर ' येत आहे.

कोल्हापूर येथील शिवाजी विद्यापीठाने मला दिलेल्या अनुदानानुसार मी तंजावर येथील सरस्वती महाल लायब्ररी मध्ये संशोधनासाठी गेलो असताना ' भावार्थ रामायणा'च्या तेथील प्रतींचा मी शोध घेतला. एकनाथांच्या ' उत्तरकांड ' रचनेचा प्रयत्न इतर कवींकडून झाल्याचे ज्ञात असल्यामुळे येथील ' उत्तरकांडा'बाबतीत मी उत्सुक होतो. आणि माझे कुतूहल सार्थ असल्याचे सिद्ध झाले ! तंजावर येथील या 'सरस्वती महाला'त 'भावार्थ रामायणा'च्या उत्तरकांडाच्या तीन प्रती असून त्यांचे क्रमांक १०२५, १०३७ व १०४४ असे आहेत; परंतु प्रत्यक्ष वाचन केल्यानंतर या तीनही प्रती एकाच उत्तरकांडाच्या नकला असल्याचे आढळून आले. मात्र हे ' उत्तरकांड' आजपर्यंत मिळविलेल्या ' तीन उत्तरकांडां'पेक्षा निश्चित वेगळे आहे. त्याचाच परिचय थोडक्यात या लेखात करून देण्याचे योजिले आहे. मला पहावयास मिळालेल्या तीन हस्तलिखित प्रतीपैकी क्र. १०२५ ची प्रत संपूर्ण असून क्र. १०३७ च्या प्रतीत आठ व क्र. १०४४ च्या प्रतीत पहिल्या अध्यायाच्या सुरवातीचाच फक्त भाग आलेला आहे.

### चौथे उत्तरकांड !

या उत्तरकांडाचे एकूण प्रसंग १६ असून ओवीसंख्या २०२६ इतकी आहे. या सोळा प्रसंगांची नावे पुढीलप्रमाणे आहेत : १. लंका उद्वस वर्णन. २. रावणवर्णन. ३. इंद्रजिद्वर्णन. ४. ऋषिगमन ५. जनक श्रीरामदर्शन. ६. राजनीति निरूपण. ७. सुराणीक












आगमन. ८. सुराणीक वध. ९. शत्रुघ्न प्रयाण. १०. मधुरापुरी राज्ये शत्रुघ्न-स्थापन. ११. दंडकारण्य विवंचन. १२. अश्वमेघ यज्ञ. १३. सीता परंधाम गमन. १४. बंधुपुत्र राज्य स्थापन. १५. लक्ष्मणनिर्याण १६. श्रीरामपरंधामगमन.

तंजावरस्थ कवि कोनेरीसुत शेष याने उत्तरकांडाची रचना केली आहे. या उत्तरकांडाचा कर्ता व त्याचा काळ यासंबंधी पुढे चर्चा करण्यात आली आहे. गावबा व मुक्तेश्वर यांचेप्रमाणेच या कवीनेसुद्धा सर्व ग्रंथभर 'एका जनार्दना शरण' अशीच मुद्रा वापरली आहे. अर्थातच यामध्ये ग्रंथकर्त्याची निस्वार्थी बुद्धी आणि श्री एकनाथांविषयीचा आदरभाव स्पष्ट होतो. या 'उत्तरकांडा'चा प्रसार महाराष्ट्रात झालेला दिसत नाही आणि तंजावर येथे याच्याच तीन प्रती आढळतात यावरून आणि काही भाषाविषयक लकबींवरून हा कवी तंजावर प्रदेशातील असावा असेच दिसून येते. 'भावार्थ रामायणा'च्या तंजावर येथील 'सरस्वती महाल लायब्ररी'तील 'युद्ध कांडा'चे वाचन करीत असताना त्यामध्ये सर्वत्र प्रसृत झालेला 'जयरामसुताने लिहिलेला अहिरावणाख्यानाचा अध्याय आढळला नाही. त्यामध्ये माझ्याकडे असलेल्या 'भावार्थ रामायणा'च्या हस्तलिखित प्रतीत असलेला व तोच मूळचा असल्याबद्दल 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'त मी परिचय करून दिलेला (पाहा अंक: १२३) अध्याय आहे. यावरून एक गोष्ट सिद्ध होते की 'भावार्थ रामायणाची' जयरामसुताचे अहिरावणाख्यान आणि गावबाचे उत्तरकांड नसलेली आणि मुळाला अधिक जवळ असलेली प्रतच तंजावर प्रांतात प्रसृत झाली. त्यामुळे या दोन्ही नंतरच्या रचना होण्याच्या किंवा त्यामधल्या काळात हे उत्तरकांड लिहिले गेले असावे असा तर्क करावासा वाटतो.

या उत्तरकांडाची सुरुवात 'चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरं' या संस्कृत श्लोकाने करण्यात आली असून त्यानंतर पुढील ओव्या आहेत:

ॐ नमो गजवदना।
तुझे नाम घेता नाश होये महावीघ्ना।
तु प्रिये होसी पंचानना। अता कथा रामायेणा साह्य
होई ॥ १ ॥

प्रतापे संपऊनी युद्धकांड। पुढे वीस्तारले उत्तरकांड।
कीर्ती शौर्य औदार्य प्रचंड। गोड ही गोड कथा श्रवण
॥ २ ॥

वाखाणावया उत्तरकांड। माझे सरते कैचे तोंड।
येका जनार्दन क्रुपा अखंड। कांडे कांड संपवीले
॥ ३ ॥

सुरवातीच्याच ओव्यांत श्री एकनाथांचा व त्यांच्या कृपेचा उल्लेख असल्यामुळे ही कृती निश्चित वेगळ्या लेखकाची आहे, हे ध्यानात येते. शेवटच्या अध्यायातील शेवटच्या ओवीतसुद्धा कवीची हीच कृतज्ञताबुद्धी दिसून येते. या ओवीमध्ये हा अनाम कवि म्हणतो,

येका जनार्दना शरण। त्याचे चरण तीर्थाचे महीमान।
उत्तरकांड जाले संपुर्ण। सद्गुरु क्रुपा प्रसादे
॥ १३५ ॥

एकनाथांच्या बद्दलचा हाच आदरभाव आणि आपली काव्य करण्याची पात्रता यासंबंधी तो वरचेवर उल्लेख करतो. तिसऱ्या अध्यायाचे शेवटी तो म्हणतो,

येका जनार्दनाचे रंक। त्याचे निजमुलीचे कौतुक।
कथा प्रबोधी अलोकिक। महिमा अपुर्व गुरुक्रपा
॥ १२५ ॥

—असाच उल्लेख चौथ्या अध्यायाचे शेवटी त्याने केला आहे.

येका जनार्दना शरण। त्याचे कृपेचे अवलोकन
तेणेकरून शेश रंक धन्य। वंशोद्धारण गुरुक्रुपा ॥११९॥

## लेखनाचे आधार, संकोच-विस्तार व बदल

या उत्तरकांडाचे लेखन मुख्यतः वाल्मीकी रामायणाचे आधारे होत असले तरी त्याने काही ठिकाणी इतरही काही कृतींचा आधार घेतला आहे. काही ठिकाणी आपल्याला इष्ट तो बदलही त्याने कथानकात करण्याचे स्वातंत्र्य घेतले आहे. मात्र त्या त्या ठिकाणी त्याचे कारण सांगण्याचे सौजन्य त्याने दाखविले आहे. या कवीच्या ठिकाणी फार मोठी कवित्वशक्ति किंवा कल्पना विलास होता असे वाटत नाही. आणि आपल्या या मर्यादा कवीही चांगल्या प्रकारे जाणतो. श्रोता व वक्ता यांच्या सुखसंवादातून त्यांच्या परस्पराविषयींच्या भावना उत्तमतऱ्हेने व्यक्त होतात. श्रोते हीच या कवीची प्रेरणा, स्फूर्ती आणि प्रोत्साहक आहे. त्यामुळे त्यांच्या इच्छेनुसार काही

ठिकाणी तो रेंगाळतो, तर त्यांची परवानगी घेऊन कथाभाग आटोपताही घेतो.

अकराव्या प्रसंगात अगस्त्याश्रमाचे वर्णन करीत असताना कवि म्हणतो, 'काय सांगो अगस्त्याश्रमासि। वर्णितां मज शक्ति कायसी... ॥ ३६ ॥' तेराव्या प्रसंगात श्रीराम चंद्रकेत–सूर्यकेताची कथा सांगतात. याठिकाणी कवी म्हणतो,

त्या मोहोत्सावाचे कथन। वीस्तारे सांगता जाण
अतीगहन म्हणउनी संकोचन।
श्रोता क्षमापुर्ण कीजे ॥ ८८ ॥

ही कवीची संकोची वृत्ती मूळ कथानकाला बरेच संक्षिप्त स्वरूप देण्यास कारणीभूत झाली असावी. बाराव्या प्रसंगात अश्वमेधाचा घोडा अडविला गेल्यानंतर शत्रुघ्नाच्या व लवकुशांच्या युद्धाची हकीगत कवी फक्त दोन ओव्यात आवरती घेतो. ते दोघेही हनुमान, बिभीषण, लक्ष्मण, भरत या सर्वांना कोणत्याना कोणत्या कारणाने संरक्षण देतात. त्यांच्याशी युद्धप्रसंग कवीने दाखविलेला नाही.

रामायण कथेची निर्मिती व तिचा प्रसार यासंबंधीचा उल्लेख कवीने शेवटच्या सोळाव्या प्रसंगात केलेला आहे. "ही रामकथा प्रथम नारदाने सांगतली. ती विश्वामित्राने ऐकली. तेथून वसिष्ठ व वाल्मीकि याचेकडे प्रसृत झाली. या कथेवर ब्रह्मदेवाने पांचशे श्लोक तयार केले. सर्व जगाच्या सुखासाठी आणि व्यासानी ती कथा ऐकून तिचा अष्टादश पुराणात समावेश केला." अशी या कथेसंबंधी कवीची उपपत्ति आहे.

कथानकाच्या ओघात कवीने ठिकठिकाणी जे उल्लेख केले आहेत, ते या संदर्भात लक्षणीय आहेत. 'श्रीरामरक्षा' या स्तोत्राचे महत्त्व श्रीरामाच्या मुखातून कवीने वदविले आहे. हा अर्थातच व्यक्तिविपर्यास आणि कालविपर्यास आहे. पांचव्या अध्यायात युद्धाजितास उद्देशून श्रीराम म्हणतात,

श्रीराम म्हणे माझे स्तोत्र। **रामरक्षा** अतिपवित्र
हे म्हणता निरंतर। आसे जाण केवळ त्यापासी ॥११३॥

–या ठिकाणचा 'रामरक्षे'चा उल्लेख अस्थानी वाटतो.

'**शिवरामायणा**'चाही आधार कवीने घेतला असावा असे आठव्या अध्यायातील पुढील ओव्यावरून वाटते :

ईश्वर म्हणे पार्वतीसी। तुवां ज्या केले प्रश्नासी
ते पुर्ण ब्रह्म सुर्यवंसी। मैनाक पर्वति विचरत ॥१२३॥
पूर्वकथा अनुसंधान। अरण्यकांडि लिहिले असे जाण।
प्रंसगी उत्तरकांडि बोलेन। ते संती परिसावे ॥ १२४ ॥

आठव्या प्रसंगात सुराणीकाचे आख्यान आले आहे. हे आख्यान या ठिकाणी येण्याची कारण परंपरा कवि पुढीलप्रमाणे सांगतो.

ऐसे सुराणीकाचे आख्यान। सांगीतले विस्तार करून
प्रताप वाल्मीकाचा गहन : जो त्रैलोक्यासी तारक ॥ ६२ ॥
ऐसे विधातयाने आपण। स्वमुखे नारदा श्रवण
नारदमुखे वाल्मीके आपण। भविष्य जाण बोलिला ॥ ६३ ॥

हे कथा यावया कारण। अयोनिजा म्हणउन कथन
**गरूडपुराणी** लक्ष्मी आपण। स्वलीला जाण बोलिली असे ॥६४॥
देवि म्हणे सुरकार्या लागी। विष्णु अवतरे युगायुगी
मीहि अवतरे तयाचे संगी। असे अवांगी अर्धांग ॥ ६५ ॥

बाराव्या प्रसंगात कवि '**अध्यात्म रामायणा**'चा उल्लेख करतो. लवकुशांनी हनुमतास सीतेकडे आणल्यानंतर त्याला उद्देशून सीता म्हणते,

रावणवधाचि कर्तव्यता जाण। त्यासि मुख्य तु कारण
श्रीराम केवल आनंदघन। हे **अध्यात्म रामायण** बोलतसे ॥ १११ ॥
जयासि असेल संशयो जाण। तेहि पाहावे **अध्यात्म रामायण**
समाधान पावावया जाण। त्या ग्रंथाते पाहावे ॥११२॥

याच अध्यायात– छाया सीतेची माहिती देताना कवि म्हणतो,

छाया नेलि लंकेसी। हे बोलिले वाल्मीक रूषी
दुसरी शक्ति गेली कैलासी। पार्वति दर्शणा लागुनी ॥ २२७ ॥

उत्तरकांडाच्या कथानकामध्ये कवीने एक महत्त्वाचा बदल केला आहे. अश्वमेघ पूर्ण झाल्यानंतर श्रीराम सीतेकडे अग्निदिव्य मागतात; परंतु याचवेळी धरणीमातेला ती आवाहन करते असा मूळ कथाभाग आहे. परंतु याठिकाणी सीता रामाच्या मागणीनुसार अग्निदिव्य







अनुक्रमणिका

आगमन. ८. सुराणीक वध. ९. शत्रुघ्न प्रयाण. १०. मधुरापुरी राज्ये शत्रुघ्न-स्थापन. ११. दंडकारण्य विवंचन. १२. अश्वमेध यज्ञ. १३. सीता परंधाम गमन. १४. बंधुपुत्र राज्य स्थापन. १५. लक्ष्मणनिर्याण १६. श्रीरामपरंधामगमन.

तंजावरस्थ कवि कोनेरीसुत शेष याने उत्तरकांडाची रचना केली आहे. या उत्तरकांडाचा कर्ता व त्याचा काळ यासंबंधी पुढे चर्चा करण्यात आली आहे. गावबा व मुक्तेश्वर यांचेप्रमाणेच या कवीनेसुद्धा सर्व ग्रंथभर 'एका जनार्दना शरण' अशीच मुद्रा वापरली आहे. अर्थातच यामध्ये ग्रंथकर्त्याची निस्वार्थी बुद्धी आणि श्री एकनाथांविषयीचा आदरभाव स्पष्ट होतो. या 'उत्तरकांडा'चा प्रसार महाराष्ट्रात झालेला दिसत नाही आणि तंजावर येथे याच्याच तीन प्रती आढळतात यावरून आणि काही भाषाविषयक लकबींवरून हा कवी तंजावर प्रदेशातील असावा असेच दिसून येते. 'भावार्थ रामायणा'च्या तंजावर येथील 'सरस्वती महाल लायब्ररी'तील 'युद्ध कांडा'चे वाचन करीत असताना त्यामध्ये सर्वत्र प्रसृत झालेला 'जयरामसुताने लिहिलेला अहिरावणाख्यानाचा अध्याय आढळला नाही. त्यामध्ये माझ्याकडे असलेल्या 'भावार्थ रामायणा'च्या हस्तलिखित प्रतीत असलेला व तोच मूळचा असल्याबद्दल 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'त मी परिचय करून दिलेला (पाहा अंक : १२३) अध्याय आहे. यावरून एक गोष्ट सिद्ध होते की 'भावार्थ रामायणाची' जयरामसुताचे अहिरावणाख्यान आणि गावबाचे उत्तरकांड नसलेली आणि मुळाला अधिक जवळ असलेली प्रतच तंजावर प्रांतात प्रसृत झाली. त्यामुळे या दोन्ही नंतरच्या रचना होण्याच्या किंवा त्यामधल्या काळात हे उत्तरकांड लिहिले गेले असावे असा तर्क करावासा वाटतो.

या उत्तरकांडाची सुरुवात 'चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरं' या संस्कृत श्लोकाने करण्यात आली असून त्यानंतर पुढील ओव्या आहेत :

ॐ नमो गजवदना ।
तुझे नाम घेता नाश होये महावीघ्ना ।
तु प्रिये होसी पंचानना । अता कथा रामायेणा साह्य होई ॥ १ ॥

प्रतापे संपऊनी युद्धकांड । पुढे वीस्तारले उत्तरकांड ।
कीर्ती शौर्य औदार्य प्रचंड । गोड ही गोड कथा श्रवण ॥ २ ॥

वाखाणावया उत्तरकांड । माझे सरते कैचे तोंड ।
येका जनार्दन क्रुपा अखंड । कांडे कांड संपवीले ॥ ३ ॥

सुरवातीच्याच ओव्यांत श्री एकनाथांचा व त्यांच्या कृपेचा उल्लेख असल्यामुळे ही कृती निश्चित वेगळ्या लेखकाची आहे, हे ध्यानात येते. शेवटच्या अध्यायातील शेवटच्या ओवीतसुद्धा कवीची हीच कृतज्ञताबुद्धी दिसून येते. या ओवीमध्ये हा अनाम कवि म्हणतो,

येका जनार्दना शरण । त्याचे चरण तीर्थाचे महीमान ।
उत्तरकांड जाले संपुर्ण । सद्गुरु क्रुपा प्रसादे ॥ १३५ ॥

एकनाथांच्या बद्दलचा हाच आदरभाव आणि आपली काव्य करण्याची पात्रता यासंबंधी तो वरचेवर उल्लेख करतो. तिसऱ्या अध्यायाचे शेवटी तो म्हणतो,

येका जनार्दनाचे रंक । त्याचे निजमुखीचे कौतुक ।
कथा प्रबोधी अलोकिक । महिमा अपुर्व गुरुक्रुपा ॥ १२५ ॥

—असाच उल्लेख चौथ्या अध्यायाचे शेवटी त्याने केला आहे.

येका जनार्दना शरण । त्याचे कृपेचें अवलोकन
तेणेकरून शेश रंक धन्य । वंशोद्धारण गुरुक्रुपा ॥ ११९ ॥

## लेखनाचे आधार, संकोच-विस्तार व बदल

या उत्तरकांडाचे लेखन मुख्यतः वाल्मीकी रामायणाचे आधारे होत असले तरी त्याने काही ठिकाणी इतरही काही कृतींचा आधार घेतला आहे. काही ठिकाणी आपल्याला इष्ट तो बदलही त्याने कथानकात करण्याचे स्वातंत्र्य घेतले आहे. मात्र त्या त्या ठिकाणी त्याचे कारण सांगण्याचे सौजन्य त्याने दाखविले आहे. या कवीच्या ठिकाणी फार मोठी कवित्वशक्ति किंवा कल्पना विलास होता असे वाटत नाही. आणि आपल्या या मर्यादा कवीही चांगल्या प्रकारे जाणतो. श्रोता व वक्ता यांच्या सुखसंवादातून त्यांच्या परस्पराविषयींच्या भावना उत्तमतऱ्हेने व्यक्त होतात. श्रोते हीच या कवीची प्रेरणा, स्फूर्ती आणि प्रोत्साहक आहे. त्यामुळे त्यांच्या इच्छेनुसार काही

ठिकाणी तो रेंगाळतो, तर त्यांची परवानगी घेऊन कथाभाग आटोपताही घेतो.

अकराव्या प्रसंगात अगस्त्याश्रमाचे वर्णन करीत असताना कवि म्हणतो, ' काय सांगो अगस्त्याश्रमासि । वर्णिता मज शक्ति कायसी... ॥ ३६ ॥ ' तेराव्या प्रसंगात श्रीराम चंद्रकेत–सूर्यकेताची कथा सांगतात. याठिकाणी कवी म्हणतो,

त्या मोहोत्सावाचे कथन । वीस्तारे सांगता जाण
अतीगहन म्हणउनी संकोचन ।
श्रोता क्षमापुर्ण कीजे ॥ ८८ ॥

ही कवीची संकोची वृत्ती मूळ कथानकाला बरेच संक्षिप्त स्वरूप देण्यास कारणीभूत झाली असावी. बाराव्या प्रसंगात अश्वमेधाचा घोडा अडविला गेल्यानंतर शत्रुघ्नाच्या व लवकुशांच्या युद्धाची हकीगत कवी फक्त दोन ओव्यात आवरती घेतो. ते दोघेही हनुमान, बिभीषण, लक्ष्मण, भरत या सर्वांना कोणत्याना कोणत्या कारणाने संरक्षण देतात. त्यांच्याशी युद्धप्रसंग कवीने दाखविलेला नाही.

रामायण कथेची निर्मिती व तिचा प्रसार यासंबंधीचा उल्लेख कवीने शेवटच्या सोळाव्या प्रसंगात केलेला आहे. " ही रामकथा प्रथम नारदाने सांगतली. ती विश्वामित्राने ऐकली. तेथून वासष्ठ व वाल्मीकि याचेकडे प्रसृत झाली. या कथेवर ब्रह्मदेवाने पांचशे श्लोक तयार केले. सर्व जगाच्या सुखासाठी आणि व्यासानी ती कथा ऐकून तिचा अष्टादश पुराणात समावेश केला. " अशी या कथेसंबंधी कवीची उपपत्ति आहे.

कथानकाच्या ओघात कवीने ठिकठिकाणी जे उल्लेख केले आहेत, ते या संदर्भात लक्षणीय आहेत. 'श्रीरामरक्षा' या स्तोत्राचे महत्त्व श्रीरामाच्या मुखातून कवीने वदविले आहे. हा अर्थातच व्यक्तिविपर्यास आणि कालविपर्यास आहे. पांचव्या अध्यायात युद्धाजितास उद्देशून श्रीराम म्हणतात,

श्रीराम म्हणे माझे स्तोत्र । **रामरक्षा** अतिपवित्र
हे म्हणता निरंतर । आसे जाण केवळ त्यापासी ॥११३॥

–या ठिकाणचा ' रामरक्षे'चा उल्लेख अस्थानी वाटतो.

'**शिवरामायणा**'चाही आधार कवीने घेतला असावा असे आठव्या अध्यायातील पुढील ओव्यावरून वाटते :

ईश्वर म्हणे पार्वतीसी । तुवां ज्या केले प्रश्नासी
ते पुर्ण ब्रह्म सुर्यवंसी । मैनाक पर्वति विचरंत ॥१२३॥
पूर्वकथा अनुसंधान । अरण्यकांडि लिहिले असे जाण ।
प्रसंगी उत्तरकांडि बोलेन । ते संती परिसावे ॥ १२४ ॥

आठव्या प्रसंगात सुराणीकाचे आख्यान आले आहे. हे आख्यान या ठिकाणी येण्याची कारण परंपरा कवि पुढीलप्रमाणे सांगतो.

अैसे सुराणीकाचे आख्यान । सांगीतले विस्तार करून
प्रताप वाल्मीकाचा गहन : जो त्रैलोक्यासी तारक
॥ ६२ ॥
अैसे विधातयाने आपण । स्वमुखे नारदा श्रवण
नारदमुखे वाल्मीके आपण । भविष्य जाण बोलिला
॥ ६३ ॥
हे कथा यावया कारण । अयोनिजा म्हणउन कथन
**गरूडपुराणी** लक्ष्मी आपण । स्वलीला जाण बोलिली
असे ॥६४॥
देवि म्हणे सुरकार्या लागी । विष्णु अवतरे युगायुगी
मीहि अवतरें तयाचे संगी । असे अर्वांगी अर्धांग
॥ ६५ ॥

बाराव्या प्रसंगात कवि '**अध्यात्म रामायणा**'चा उल्लेख करतो. लवकुशांनी हनुमतास सीतेकडे आणल्यानंतर त्याला उद्देशून सीता म्हणते,

रावणवधाचि कर्तव्यता जाण । त्यासि मुख्य तु कारण
श्रीराम केवल आनंदघन । हे **अध्यात्म रामायण**
बोलतसे ॥ १११ ॥
जयासि असेल संशयो जाण । तेहि पाहावे **अध्यात्म**
**रामायण**
समाधान पावावया जाण । त्या ग्रंथाते पाहावे ॥११२॥

याच अध्यायात– छाया सीतेची माहिती देताना कवि म्हणतो,

छाया नेलि लंकेसी । हे बोलिले वाल्मीक रूषी
दुसरी शक्ति गेली कैलासी । पार्वति दर्शणा लागुनी
॥ २२७ ॥

उत्तरकांडाच्या कथानकामध्ये कवीने एक महत्त्वाचा बदल केला आहे. अश्वमेध पूर्ण झाल्यानंतर श्रीराम सीतेकडे अग्निदिव्य मागतात; परंतु याचवेळी धरणीमातेला ती आवाहन करते असा मूळ कथाभाग आहे. परंतु याठिकाणी सीता रामाच्या मागणीनुसार अग्निदिव्य



अनुक्रमणिका

करते, त्यावेळी स्वतः अग्नि प्रगट होतो आणि त्याच्या सांगण्यावरून श्रीराम सीतेचा स्वीकार करतात व तिला अंतःपुरात पाठवितात अशी हकीगत कवि सांगतो. या फरकाची स्वतः कवीलाही जाणीव आहे. त्यामुळे लागलीच तो या संदर्भात खुलासाही करतो—

**वाल्मीक रामायणी कथा आहे ऐसी** । अश्वमेध समइ दीव्य मागता सीतेसी । ते गेली पृथ्वीगत होऊनी परंधामासी । अग्नी कुंडी दिव्य कैचे म्हणतील ॥७५॥ ऐसे न मनावे श्रोती । हे युग व्यवस्थानी स्थिती । कोणे एके अवतारी हे स्थिती । श्री रघुनाथे पै केली ॥ ७६ ॥ यदर्थी प्रमाण **शतकोटी रामायण** । कैकसीते पुसे रावण स्वरूप चिन्ह । तेची मीसे परंघामा भुमीगत होउन । जाईल देखा ॥ ७७ ॥

काही काल गेल्यानंतर कैकेयी सीतेच्या चारित्र्या-बद्दल आक्षेप घेते. ती रामाला म्हणते, ' रावण प्रति-मेसी ( सीतेचे ) चीत्त लोभले ' तेव्हा श्रीराम सीतेकडे पुन्हा दिव्य मागतात. यावेळी मात्र सीता रामाकडून निरोप मागते व आपली भेट वैकुंठात होईल असे सांगते. धरणीला विवर पडते आणि सीतेला घेऊन धरणीमाता नाहीशी होते. याठिकाणी परटाच्या अप-वादाऐवजी कैकेयीच्या आरोपाला कवीने महत्त्व दिलेले दिसते. सीतेच्या निर्याणाची हकीगत सांगताना कवि म्हणतो,

येका जनार्दना शरण । कुश लहुवादी आस्ट बंधु जाण । यांचे करून या ळश । सीता परंधामया प्रती गेली ॥१३७॥

## रामावताराचा हेतु

अकराव्या प्रसंगात शंबुकवधाची हकीगत आलेली आहे. ब्राह्मणपुत्राचा मृत्यु रामराज्यात झाल्यामुळे त्याचेबद्दल श्रीरामास दूषण देण्यात येते आणि रामावताराची आठवण करून देण्यात येते.

आता घडले तुम्हा येणे । रावणदिक संव्हारणे
पृथ्वीसि आनंद करणे । याचि कारणे स्वामिनाथा ॥२०॥

आता जयाचा स्वधर्म नव्हे जाण । तो करी तप पृथ्विस दारुण
स्वभावे तेणे करून । द्विजपुत्र मरण याचि कारणे श्रीरामा ॥२१॥

स्वधर्मविरहित आचरण करणाऱ्यांना शिस्त लावणे हाच श्रीरामाच्या अवताराचा कवीच्या दृष्टीने हेतु दिसतो. परंतु पुढच्या १२ व्या प्रसंगात लवकुशांना उद्देशून श्रीराम म्हणतात,

गाई ब्राह्मणावरि शस्त्र । उचली ऐसा रविवौंसी नव्हे सुर ।
यास्तव तुम्ही रुषीकुमर । म्हणउनि पृच्छा केली । ॥ ३७ ॥

गोब्राह्मण प्रतिपालनांची क्षत्रियांची परंपराही इथे स्पष्ट केलेली दिसते. मात्र एकानाथांप्रमाणे तत्कालीन परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर या कवीने रामावताराचा हेतु स्पष्ट केलेला नाही किंवा तशा तऱ्हेचे चित्रणही केलेले नाही हे मान्य करावयास हवे. अश्वमेधासाठी बोलवावयाच्या ब्राह्मणात अनेक प्रदेशातील लोकांचा उल्लेख मुक्तेश्वरासारखा कवी करतो. या उत्तरकांडाचा कर्ता पुढीलप्रमाणे माहिती देतो– ' देशो देशिचे ब्राह्मण । न्याय मीमांशक व्याकरण । सिद्धांतवादि दशावधान । कृष्णागोदातिरवासी ॥ ७२ ॥ निमि-शारण्य ताम्रपर्णी । ऐसे ब्राह्मण बोलाउनी । स्थलो-स्थलिंचे द्विज मुनी । यति ब्रह्मचारि बोलाविजे ॥७३॥ हे सांगताना कृष्णा-गोदावरी तीरावरील आपल्या संबंधिताना तो विसरलेला नाही.

## फलश्रुति

ग्रंथाच्या शेवटी कवीने फलश्रुती सांगितलेली आहे. कवी श्रीरामाचा उपासक तर आहेच, पण त्याच्या कृपेचा प्रत्ययही त्याला आलेला आहे. त्यामुळे त्याचे हे प्रचीतीचे बोलणे आहे असे म्हणावयास हरकत नाही. ' या कथेच्या श्रवणाने मोक्षप्राप्ती होईल. धर्म अर्थ काम मोक्ष हे चारी पुरुषार्थ साधतील. दारिद्र्याचा नाश होईल. पुत्रपौत्रादि संतती प्राप्त होईल आणि सन-दिकांच्या सहवासात परलोकात वास्तव्य करावयास मिळेल ' असे कवीने सांगितले आहे. [ हे कथा वैकुं-ठीची सीडी । स्वहीतालागी जो ऐकेल आवडी । तो पावेल पैलथडी । सद्गुरु बिश्वासे करुनी ॥ १०७ ॥ स्वये ब्रह्मदेव आपण । ग्रंथासी दीधले वरदान । धर्मार्थ काम मोक्ष संपूर्ण । परायेण पावीजे ॥ १०८ ॥ ईह-लोकी दरीद्रनासी । पुत्रपौत्र वाढे संततीसी । परलोकी पावे मोक्ष सुखासी । जेथे सनकादिक आसती ॥ १०९ ॥ जे जे धरीला मनोरथासी । ते ते पावेल: स्वलीलेसी ।








श्रीरामचरित्राची ख्याती ऐसी । मज प्रत्ययासी बाणली ॥ ११० ॥

कवीने काही ठिकाणी कथाभागांचे संदर्भ दिलेले असले तरी एकनाथांप्रमाणे संस्कृत श्लोक देऊन नंतर ओव्या रचण्याची पद्धत त्याने येथे अनुसरलेली दिसत नाही. मूळ कथाभाग साध्या, सोप्या व श्रद्धायुक्त भाषेत त्याने सांगण्याचा प्रयत्न केला आहे. कल्पना चमत्कृति किंवा वाग्विलास यांचा प्रत्यय इथे फारसा येत नाही. काही ठिकाणी एकनाथांपेक्षा वेगळाच कथाभाग तो आपल्याला सांगतो. दंडकारण्याची हकीगत या दृष्टीने उल्लेखनीय आहे. एकनाथ अरण्यकांडामध्ये ही कथा सांगताना म्हणतात, 'मग अगस्ति म्हणे श्रीरामासी । दंडक राजा या प्रदेशी । अतिगर्विष्ट अहर्निशी । राज्यमदेशी उन्मत्त ॥ ६३ ॥ पारधी करिता दंडकासी । भृगुवंशीचा च्यवनऋषी । अपमानिला अतिशयेसी । तेणे त्यासी शापिले ॥ ६४ ॥ शाप दिधला कोपेसी । भस्म होय स्वराज्येसी । ऐसे बोलताचि ऋषि । स्वदेशेसी भस्म झाला ॥ ६५ ॥ विंध्याद्रि दक्षिणभागेसी । जव पाविजे सेतुबंधासी । तंव दंडकारण्य नाम यासी । ऋषीशापेसी भस्म जाले ॥ ६६ ॥

– परंतु प्रस्तुत कवि या उत्तरकांडात वेगळीच कथा या संदर्भात सांगतो. ती अशी आहे:–

श्रीराम पुसे मुनिसी । दंडकारण्य नाव कायसी । येरू म्हणे त्याही कथेसी । तुं पुससी तरि सांगेन ॥ ९६ ॥ मुनि म्हणे दंडधर राजा नाम जाण । त्याचा पुत्र युक्ष्वाकु आपण । त्यास दंड नित्य निरऊन । स्वराज्याधिकारी ठेविले ॥ ९७ ॥ मग आपण गेला तपासी । ईक्ष्वाकु करी धर्म नितिसी । तयासि पुत्र जाले धर्मसील प्रतापेसी । परमपुरुषार्थी सीलवंत ॥ ९८ ॥ त्यात एक पुत्र कनीष्ट । पापाचारी परमभ्रष्ट । त्रैलोक्यात माहादुष्ट । अदट जाण नाम त्यासी ॥ ९९ ॥ त्याचा दुराचार देखोन । पीत्याने विंध्याद्रि सीखरी जाण । मधुपुरी करुनि निर्माण । राज्याधिकारी स्वयें केला ॥ १०० ॥ ऐसे करीता स्वराज्यासी । कित्येक काल गेले परीयसी । अकस्मात आला शुक्र आश्रमासी । त्याचि कन्या देखिली ॥१०१॥ अतिसुंदर मनोहर । रूप लावण्य गुण गंभीर । तीस देखोनि जाला कामातुर । मग म्हणे दे अंग संग मजलागी ॥ १०२ ॥ ते म्हणे मी पितिया आधीना विधिपुर्वक करी लग्न । नरे बलात्कारे करून । रती संपुर्ण विचरला ॥ १०३ ॥ मग गेला स्वधामासि । शुक्र आला आश्रमासि । कन्या देखिलि भुक्त पुरुशी । अंतरज्ञानेसि विचारिले ॥ १०४ ॥ कन्या देखिलि रजोयुक्त । शुक्र जाला क्रोधावर्त । मग बोले शापयुक्त । अति आवेशे करूनी ॥ १०५ ॥ शुक्र म्हणे सराज्य नगर । सप्रजा सशैन्य रथकुंजर । वाजी जाण भस्म होति समग्र । क्षणमात्रे करूनी ॥ १०६ ॥ शतयोजन राजमंडल । उद्वस जाले तात्काळ । वृक्ष तृण शोधिले जल । अति दुष्काल ते ठाई ॥ १०७ ॥ तदारभ्य जाण । आजिवरी पडिले शुन्य । याचे नांव दंडकारण्य । साहा रात्रित भस्म जाले ॥ १०८ ॥ अध्याय ११

### या उत्तरकांडाचा कर्ता कोण?

या उत्तर कांडामध्ये स्पष्टपणे कवीचा नामोल्लेख नसल्यामुळे व 'एका जनार्दना शरण' या अध्यायाअखेरीच्या मुद्रेमुळे सुरवातीस वाचक साहजिकच संभ्रमात पडतो. परंतु या 'उत्तरकांडाचे पुनः एकदा बारकाईने वाचन करीत असताना चौथ्या प्रसंगाच्या शेवटच्या ओवीत झालेल्या एका उल्लेखामुळे हे कोडे उलगडले आणि हे उत्तरकांड रचणारा तंजावरस्थ कवी आहे व त्याचे नांव कोनेरीसुत शेष हे आहे हे स्पष्ट झाले. ही ओवी अशी आहे—

येका जनार्दना शरण । त्याचे कृपेचे अवलोकन
तेणे करून **शेष** रंक धन्य । वंशोद्धारण गुरुकृपा ॥११९॥

या ओवीतील 'तेणे करून **शेष** रंक धन्य' या चरणाकडे माझे लक्ष आकर्षिले गेले आणि मराठीमध्ये विविध प्रकारची रचना करणाऱ्या शेष कोनेरीसुतासंबंधी विचार सुरू झाले. आपल्या वेगवेगळ्या कृतींमध्ये स्वतःविषयीचा उल्लेख या शेष कवीने पुढीलप्रमाणे केला आहे:

बृहस्पती वदला पाप धौत । म्हणौनी शौनका सांगे सूत ।
खंडेकर कोनेर सुत । **शेष** विनवित श्रोतयासी ॥
( श्री तुलसी महात्म्य- अ. १५. )

शिव कथिले म्हणोनी प्रीती । शौनकादिका कथी सौती
कोनेरसुत **शेष** सुमती । करी विनंती श्रोतया ॥
(श्री तुळसी महात्य अ. ११. )

म्हणौनी नैमिषवनी । शौनकादिका सुतमुनी ।
कथिता जाला ते पावनी । ऐकिजे श्रवणी **शेष** म्हणे ॥ ३४ ॥
(श्री तुलसी महात्म्यः अ. ५ )








म्हणोनी श्रोतयां प्रती । शेष करीतसे विनंती
(तंजपुरी महात्म्य अ. ३०)
येथ मीपणासि नाही ठावो । बोलविता सद्गुरु गावो
सर्वसाक्षी रघुपुंगवो । जाणे भावो शेष म्हणे ॥ ४८ ॥
(अद्भुतकांड रामायण–प्रसंग ३.)

या सर्व उल्लेखांवरून या उत्तरकांडाचा कर्ता कोनेरीसुत शेष हाच आहे हे स्पष्ट होते, मुळापेक्षा काही वेगळे सांगण्याची त्याची आवड या उत्तरकांडात जशी दिसून येते, तशीच ती 'अद्भुतकांड रामायणा'तही आढळते. किंबहुना असे म्हणता येईल की या आवडी-मुळेच या 'रामायणा'ची रचना त्याने केली आहे. (क्र. ९८३) वाल्मीकांने आपला शिष्य भारद्वाज याला ही कथा सांगितलेली आहे. शतकोटिरामायणाची वाटणी त्रैलोक्यात झाल्यामुळे आपल्या शिष्यासाठी वाल्मीकि 'अद्भुतकांड रामायण । आठवे कांड हे पावन' सांगत आहेत अशी कवीने कल्पना केली आहे 'आठवे कांड' या शब्दप्रयोगावरूनच मुळा-पेक्षा ते वेगळ असल्याची कल्पना सुरवातीलाच स्पष्ट होते. पहिल्या प्रसंगात अंबरीष ऋषीची कथा सांगि-तल्यानंतर कवी म्हणतो—

यापरी वाल्मिकी ऋषी । कथिता होय भरद्वाजासी
कोनेरीसुत आदरेसी । श्रोतयासी शेष म्हणे ॥ ५६ ॥

या अद्भुत कांडरामायणात श्रीमती स्वयंवर, सीतेच्या जन्माच्या वेगळा हकीगत, सीताकृत सहस्रमुख रावणवधकथा इत्यादी भाग आलेला आहे.

या 'शेष' कवीच्या संबंधाने 'महाराष्ट्र सारस्व-ताच्या नव्या पाचव्या आवृत्तीत डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी दिलेली माहिती पुढीलप्रमाणे आहे– 'येथे डोलोत्सव गीत (क्र. १८५४.) या नावाच्या काव्याचा परिचय करून देतो. हे गीत लिहिणारा कोणी शेष नावाचा कवी असून विवाहानंतर वधूवर डोल्यावर म्हणजे हिंदोळ्यावर बसून झोके घेतात तेव्हा म्हणा-वयाची ही गाणी आहेत. डोलोत्सव तामीळनाडमध्ये नवरात्रामध्ये होतात, त्यावेळी ही गाणी गायली जातात (पृ. ८९५.) ... याच शेष कवीच्या नावाचा 'हालास्य महात्म्य' म्हणून ७००० ओव्यांचा एक स्वतंत्र ग्रथ आम्हास महाराष्ट्र समाजाच्या संग्रहात मिळाला, ग्रंथकार शिवभक्त असावा याहून त्याची अधिक माहिती मिळत नाही.' (पृ. ८९६)

परंतु तंजावर येथील 'सरस्वती महाल' ग्रंथालया-मध्ये या शेष कवीची विपुल रचना उपलब्ध आहे. या शेष कवीने रचलेल्या ग्रंथामध्ये पौराणिककथा, आख्याने, रामायण कथा, स्थलवर्णन किंवा महात्म्या-प्रमाणेच वैद्यक शास्त्रविषयक रचनाही आहे. शिवाय डॉ. तुळपुळे यांनी सांगितल्या प्रमाणे विविध उत्सव-प्रसंगी म्हणण्यासारखी गीतेही या कवीने रचलेली होती हे स्पष्ट होते. या शेष कवीच्या उपलब्ध वाङ्मयाचा त्रोटक परिचय येथे करून देत आहे.

या शेष कवीची पुढील रचना आज उपलब्ध आहे.

१. पांडुरंग महात्म्य अध्याय १२ ओव्या १४८८
२. श्रीतुलसी महात्म्य अध्याय १५ ओव्या ९००
३. तंजपुरी महात्म्य अध्याय ३० ओव्या २२६२
४. अद्भुतकांड रामायण अध्याय ३ ओव्या १७५
५. भावार्थ रामायण : उत्तरकांड अध्याय १६ ओव्या २०२६
६. हालास्य महात्म्य ओव्या ७०००
७. बुल्बुलाचे लक्षण स्फुट पदे ११
८. डोलोत्सव गीत

एकंदर सुमारे चौदा हजार ओव्यांचा हा ग्रंथसंभार आहे 'बुल्बुलाचे लक्षण' हा वैद्यकशास्त्रावरील छोटासा ग्रंथ आहे. 'तंजपुरीमहात्म्य' हा ग्रंथ कवीचे तंजावर येथील वास्तव्य दर्शविणारा आहे. या ग्रंथामध्ये कवीने तंजावर राज्याचे मूळ संस्थापक जे चोळ राजे त्यांच्या वंशातील अनेक थोर व्यक्तींची माहिती दिली आहे. त्याचबरोबर याच राजांनी बांध-लेल्या तंजावर येथील बृहदीश्वर मंदिराचे महात्म्य सांगून त्याच्या शिवलिंग प्रतिष्ठा, कुम्भाभिषेक इत्यादींचे भक्तिपूर्ण वर्णन केले आहे. चोळ राजांच्या चोळ खंडाचे वर्णनही त्याने दिले आहे. या वेग-वेगळ्या ग्रंथात त्याने स्वतःची माहिती देणाऱ्या ओव्या सगळीकडे सारख्याच दिल्या आहेत. अद्भुतकांड रामायणात त्याने पुढीलप्रमाणे स्वतःची हकीगत सांगितली आहे :

मंदिनीकर कुलसंभव । रुक्मांगद पुत्र ज्ञानविभव
गंगाधराख्य अभिनव । जया सद्भाव श्रीरामचंद्री ॥४५॥
श्री शिवरामेंद्र योगिवर । तदनुग्रहीत दयासागर
रुक्मसुत म्हणती ज्यासि थोर । लक्ष्मी नृसिंहपर सदा ॥४६॥












तयाचा श्री अभयहस्त । माझिया माथा सदा वर्तत
तो जैसा बोलवीत । तैसा बोलत मी जाणा ॥४७॥
येथे मीपणासि नाही ठावो । बोलविता सद्गुरुरावो
सर्व साक्षी रघुपुंगवो । जाणे भावो शेष म्हणे ॥४८॥

यावरून याच्या कुळाचे नाव 'मिदिनीकर' असे होते. याचे आजोबा रुक्मांगद व वडील गंगाधर. हा गंगाधर रामचंद्र व लक्ष्मी नरसिंह यांचा भक्त होता. आणि त्याला योगी श्रीशिवरामेंद्र यांचा अनुग्रह झालेला होता. आपल्या वडिलानाच शेषाने गुरुस्थानी मानिले होते. या गंगाधराचेच दुसरे नांव 'कोनेरी' असे असावे 'श्रीतुळशी महात्म्या'त त्याने आपला उल्लेख 'खंडेकर कोनेरीसुत शेष' असा केला आहे. याचा काळ मात्र निश्चितपणे समजत नाही. 'तंजपुरीमहात्म्य' या ग्रंथाच्या शेवटी पुढील ओव्या आढळतात. 'जेथे भासेल वंश संभूत । प्रतापसिंह विख्यात । तयाचा पुत्र गुणवंत । राजा पुनित अमरसिंहेंद्र ॥३४॥ दया सत्य शीलवंत । चतुरंग दळेसी समवेत । विक्रमी संतत समावृत । राज्य करीत पुत्रपौत्रेसी ॥ ३५ ॥ या उल्लेखावरून शेष कोनेरीसुत हा कवि या अमरसिंह राजाच्या कारकीर्दीत काव्यरचना करीत होता असे दिसते. म्हणजे शके १७०८ च्या सुमारास त्याची ही रचना झालेली आहे. कारण अमरसिंहाची कारकीर्द शके १७०८ ते शके १७२० अशी आहे. या अमरसिंह राजासंबंधी पुढीलप्रमाणे माहिती मिळते.

' As serfoji was too young, Amar Singh, Pratap's Son by a sword-wife, became regent as desired by tulaja Raja. But shortly after the king's death Amar singh began to plot against Serfoji, and with the help of the East India company became the ruler himself. Amar Singh ruled from 1788 to 1798. He is said to have ill-treated the young-boy entrusted to him by Tulajaji. But for timely rescue of Serfoji by Schwartz, the Danish Missionary, Serfoji would have fallen a prey to machinations of Amar Singh.

As Amar Singh ousted Serfoji on The ground that his adoption was invalid, Schwartz studied hard to find out the truth from the scriptures and ultimately induced the english to decide that the adoption was perfectly valid.

Except for his treatment of Serfoji, Amar Singh is said to have been a good ruler and also liked by his people. But ablack record exists against him as he consistently faught against the influence of the English "
[ S. Gopalan ' Peeps into Saraswati Mahal ' pp. 34 ]

अमरसिंहाच्या हकीगतीवरून इंग्रजांच्या धोरणानुसार न वागण्याचा गुन्हा त्याने केल्यामुळे त्याच्यावर काही आरोप ठेऊन त्याला इंग्रजानी पदच्युत केले असावे असे दिसते. त्याचा राज्यकारभार लोकप्रिय होता यावरून त्याच्यासंबंधी शेष कवीने काढलेले उद्गार सार्थ होते असेच म्हणावे लागेल. या अमरसिंहाच्या कवीने केलेल्या उल्लेखावरून कोनेरी सुत शेष हा कवी अठराव्या शतकाच्या अखेरीस तंजावर येथे काव्यरचना करीत होता असे म्हणावयास कोणताही प्रत्यवाय नाही. यामुळेच मला उपलब्ध झालेल्या या शेष कवीच्या 'भावार्थ रामायणः उत्तरकांडा'ची रचना शके १७०८ ते शके १७२०च्या दरम्यान झाली असावी असे म्हणता येण्यासारखे आहे.

या शेष कवीच्या काव्यरचनेची व शैलीची कल्पना यावी म्हणून आज उपलब्ध झालेल्या त्याच्या उत्तरकांडातीलच बाराव्या प्रसंगातील एक उतारा पुढे देत आहे—

अश्वमेधाचा घोडा धरला गेल्यानंतर व आपले बंधु हतबल झाल्यानंतर श्रीराम स्वतः लवकुशांशी युद्ध करण्यासाठी येतो. लव आणि अंकुशांना श्रीरामाचे प्रथमच दर्शन झाले, त्या रूपाचे वर्णन ऐकण्याची इच्छा श्रोत्यांमध्ये निर्माण झाली आणि त्यांनी तशी कवीला विनंतीही केली. [ लव अंकुश राम देखते जाले दृष्टी । त्यांच्या रूपाची स्थिति मोठी । श्रोते म्हणति










बोला वाग्पुटी । आम्हा चातक श्रवणार्थी ॥१५३॥ त्यांचे परिसोनि उत्तर । येका जनार्दन जाला सादर । म्हणे तुमचे कृपेस्तव बोलेन निर्धार । चित्त देउनि परिसावे ॥१५४॥ ] त्या विनंतीनुसार कवी श्रीरामाचे अध्यात्मिक व काव्यमय वर्णन करतो :
अज्ञानबाहु घनसावला । त्रिपुंड रेखिला पोवळा । मस्तकी मुकुट तेजागला । तेथे रविकला लोपल्या ॥५५॥
सुर्यासि किरण प्रकासी । श्रीराममुगुटि रविकोटिच्या रासी । लाजोनि राहिल्या आकाशी । याचेनि वौंशासि भुषण ॥५६॥
श्रीरामाचे पाहता मुख । कोटि ईंदुसी शोभा अधिक अपली क्षीणता जावया देख । मुखचंद्रि राहिला ॥५७॥
श्रीरामे अभय देउनि चंद्रासी । पुर्णमासी पुर्णता देउनि स्थापिला आकाशी । याचे वौंसी सुह्रदता आम्हासी । अैसे भविष्यासी जाणोनी ॥५८॥
श्रीरामाचे पहाता कपाल । ब्रह्मादिकांचे जन्म सफल । ते म्हणति आजि आमुचा फलत्काल । रघुकुलपाल देखिला ॥५९॥
श्रीरामाच्या पाहता भृगुटी । रचि ब्रह्मांडाच्या कोटी तेहि सांडुनी व्यंकटी । कृपादृष्टी पाहतसे ॥१६०॥
नेत्रि द्यावया कमल उपमा जाण । ते सुर्यासि लिन होति आपण येथे श्रीरामाचे देखलेपण । दुजे आन पै नाही ॥६१॥
पाहता श्रीरामाचे नासिक । तीत पुष्पा उपमा जनी देख । परि ते सकलांचे आस्तिक । नास्तीक भाव उरो नेदी ।
पाहता श्रीरामाची दंतपंक्ति । सुर्यचंद्र प्रभा त्याते लाजविती तेथे वस्ती केली वेदश्रुती । जे विश्वासी सुखकारी ॥६३॥
श्रीरामाचे उभय वोष्ट । पाहता प्रवाल आरक्तता किमात्र । तेथुनि श्रवे जे अमृत । ते सेवि सुखे जानकी ॥६४॥
श्रीरामाच्या पाहता कर्णाकडे । कर्णीच्या कुंडलांचे दीप्ती उपमा न घडे म्हणउनि श्रवणी भक्ति आतुडे । भक्ता करी ॥६५॥
येक म्हणति कुंडले साकार । येक म्हणति मकराकार परि ते श्रवण निर्विकार । ते सुखसार हरि जाणे ॥६६॥
पाहता श्रीरामाचा कंठ । ते मुख्य वेदाचे मुल पोट तेथुनि वेद जाले प्रगट । च्याहि ते म्हणविती ॥६७॥
सरस्वति बोलता श्रमली । मग विश्रांति स्थल पाहो लागली श्रीराम जिव्हेसी वस्ती केली । शट्शास्त्रेसी सुख घेत ॥६८॥
पाहता श्रीराम ह्रदय भुवन । जे योगियांचे विश्रांति-स्थान तेथे बैसले मुनिजन । विश्रांति स्थान म्हणउनि ॥६९॥
श्रीराम कंठी पदक । तेथे संत भाकुति देख जे राहिले सम्यक । येथुनि आता परतणे नाही ॥१७०॥
देखता श्रीरामाचे उदर । जेथे त्रैलोक्यासि आधार ब्रह्मा येउनि करी विचार । आपण येथे राहावे ॥७१॥
विधाता बैसला ध्यानी । त्यासि श्रीराम बोले नाभि म्हणोनि । मग स्थापुनि नाभीस्थानी । श्रृष्टि श्रृजनी अधिकारू ॥ ७२ ॥
पाहता दृष्टी गेलि कटिस्थळी । क्षुद्र घंटिकेचि मालु देखिली प्रतिघंटे माजी ब्रह्मांडे आटली : अैसी उपमा ॥ ७३ ॥
पाहता पीतांबर परिधान । तेणे आछादिलें त्रिभुवन मग विद्युल्लता आलि शरण । त्यावरी आपण जडोनि ठेली ॥ ७४ ॥
अंशमात्र राखोनि आकाशी । आपण जडलि कटि-प्रदेशी विश्रांति पावोनि मानसी । उदय अस्तु विसरली ॥ ७५ ॥
चंद्रि केलि मुखि वस्ती । नक्षत्रीं स्तविला जानकीपति त्या देउनि अभयोक्ति । किंकिणी माजि ठेविली ॥७६॥
पाहता श्रीराम गुह्यासी । त्यांचा शोध न कळे माहा-देवासी तेथे येक सुख प्राप्त जानकीसी । ईतरासि ते केविप्राप्त ॥ ७७ ॥
दृष्टि गेली जानुप्रदेसी । तेथे ईंद्रादि देव राहिले सुखेंसी म्हणति विश्रांति आम्हासी । येथे द्वैत नाशले ॥७८॥
जव जानु देखिली दृष्टी । तव वोळखि घातली मिठी जंघ आश्रये सुख दिसे दृष्टी । मग ते तेथे राहिली ॥ ७९ ॥
ईतर लोक उपमा देती कर्दलि स्तंभाची । परी कर्दलिस्तंभ महिमा न पवे येथीची ।

योग्यता जाणोनिया त्याची ।
भगवद्भक्ती बोलावी ॥ १८० ॥
उभय उरुचि महिमा मोठी । तेहि रूधली अभक्तिचिया वाटी ।
येउ नेदि भक्ति निकटी । महिमा मोटी श्रीरामाची ॥ ८१ ॥
सवेची पाहता गुल्फकाकडे । तेथील सुखविभीषणादिकी आतुडे
येवं पुजका पडिपाडे । ते सुख नातुडे कल्पान्ती ॥८२॥
जव दृष्टि गेलि चरणकमळी । तव तिणे कुर्मपृष्टि वरी वस्ती केली
त्याची शोभा सहस्त्रफणांने धरिली । स्मृतिने जिव्हा चोरलिया ॥ ८३ ॥
अैसी चरण कमळिची शोभा । तेथे सनकादिक होऊनि आंभोद गर्भा
नारद वीणा घेउनि उभा । नामघोशे गर्जत ॥ ८४ ॥
लक्ष्मीची चरण कमली वस्ती । या कारणे चरणी सकल तीर्थे राहती
प्रीतीने धरी मस्तकी उमापती । तेचि त्रैलोक्यी पावन ॥ ८५ ॥

यावरी अंदुवांचा झणत्कार । तो उरी गर्जति दैत्य अपार
येथे सुरवर परात्पर । नाथे गर्जना करिती ॥ ८६ ॥
काय वर्णु ध्वज अंकुश रेखा । जेणे उणिव आणिली ब्रह्मसुखा
गमन विसंबे देखा । हृदय कमलि धरिती जाली ॥८७॥
अैसे आपाद मस्तक परियंत । पाहता लहु अंकुश विस्मित
आनंदे न समाति श्रृष्टि आत । आजि रघुनाथ देखिला ॥ ८८ ॥
आपाद वनमाला चरणावरि लोळे । त्यामाजि वैजयंती रुळे ।
त्यामाजि श्रीवछलांछन आगळे । तेथे जनबाळे विश्रांती ॥ ८९
हाति धनुष्य धरिले मुष्टी । उभय करि मुद्रिका गोमटी
अैसिया देवाचे मानि दृष्टी । सहिता जगजेटी देखती ॥ १९० ॥

येणे रीती मदनमूर्ति घनसावळा ।
भक्तानी भक्तीने चंदन सर्वांगी चर्चिला ।
सुवास सुमेधावरदवाला ।
सुखे खलिला शोभित ॥ ९१ ॥

---












प्रा. म. ल. वराडपांडे

# पिंगा : एक अभिनव अर्थाविष्कार

बी कवीच्या 'पिंगा' या कवितेचा अन्वय लावण्याचा सर्वप्रथम प्रयत्न आचार्य प्रल्हाद केशव अत्रे यांचा. 'या कवितेत 'अहं' या शुद्ध जाणीवेचा आणि कल्पनेच्या अनंत वृत्तींचा खेळ आहे. शुद्ध 'अहं' स्फुरण ते 'मी' आणि विकृत अहंभाव म्हणजे देहभाव किंवा द्वैताचे भान हा पिंगा अशी कल्पना या काव्यात केलेली आहे' असे त्यांचे मत आहे. पण ही अर्थनिष्पत्ती संपूर्ण काव्याला लावून दाखवताना त्यांचा इतका गोंधळ उडाला आहे की शेवटी त्रासून ते म्हणतात, 'या कवितेतील प्रत्येक शब्दाचा व कल्पनेचा सुसंगत अर्थ लावणे कठीण आहे. वेदान्तविषयातील क्लिष्ट परिभाषा व गूढ कल्पना यांची वृत्तबद्ध गुंतावळ प्राकृत मराठी वाचकांना उकलणे कालत्रयीही शक्य नाही. गोविंदाग्रजांचे 'कलगीचे गाणे' किंवा केशवसुतांचा 'झपूर्झा' या काव्यातील काही कल्पनांचा अर्थ समजावून सांगण्यास हिमालयाच्या गुहेतील एखादा सिद्धपुरुषच पकडून आणावयाला पाहिजे. Bee कवींच्या 'पिंग्या'लाही क्षणभर या काव्याच्या पंक्तीला बसविण्यात अन्याय होणार नाही.

आचार्यांच्या अर्थनिष्पत्तीवर अधिकृत आक्षेप प्रत्यक्ष कवीनेच घेतला. प्रकाशकाला लिहिलेल्या ७ एप्रिल १९४७ च्या पत्रात बी म्हणतात 'पिंगा या कवितेचा अर्थ असा : 'प्रकृति, अहंकार, मन, मनाच्या वृत्ति आणि चैतन्ययुक्त काया (देह) इतक्यांचा मिळून पिंगा हा तरुण मुलींचा खेळ झाला आहे. या विषयावर तुकारामांची दोन व एकनाथांची तीन अशी पाच पदे पूर्वीच प्रसिद्ध झाली आहेत. आणि माझे हे सहावे पद आहे.' पण कवीचा खुलासा एवढ्यापुरताच मर्यादित आहे. स्वतः बींनी देखील आपल्या कवितेचा व त्यातील कल्पना व प्रतिमांचा सुसंगत अर्थ सांगण्याची तसदी घेतली नाही.

यानंतर ही 'वृत्तबद्ध गुंतावळ' सुसंगतपणे उलगडण्याचा प्रयत्न झालाच नाही. काही टीकाकारांनी मुख्यत्वे डॉ. वाळिंबे, प्रा. वा. ल. कुलकर्णी प्रभृती मंडळींनी या कवितेचा ओझरता नामोल्लेख बी कवीवर टीकाटिप्पणी लिहिताना केलेला असला तरी संपूर्ण कवितेचे विवेचन कोणीही केलेले नाही.

कदाचित् समग्र मराठी काव्यसाहित्यातील या विषयावरील सहाव्या पदाच्या प्रत्यक्ष कर्त्याने केलेल्या अधिकृत खुलाश्यानंतर पिंग्यातील आध्यात्मिक व तत्त्वप्रधान प्रतिमांचा वा संकेतांचा आणखी अर्थ तो काय लावायचा या भावनेने टीकाकारांनी मौन धारण केले असेल. प्रा. भवानीशंकर पंडितांच्या मते बींनी ही कविता सरळसरळ केशवसुतांच्या 'झपूर्झा' या कवितेला समोर ठेऊन लिहिलेली आहे 'झपूर्झा'चे भरपूर चर्वितचर्वण झालेले असल्यामुळे त्याच्या या प्रतिकृतीची दखल घेण्याचा उत्साह कोणात फारसा उरला नसेल. किंवा प्राचार्यांच्या भाषेत बोलायचे झाले तर कवीच्या वाचकात 'हिमालयाच्या गुहेतील एखादा 'सिद्धपुरुष' नसल्यामुळे या काव्यातील प्रतिमासृष्टी गूढ व दुर्बोधच राहिली.

## बींच्या संपूर्ण काव्याच्या संदर्भात 'पिंगा' कवितेचा अर्थ

'पिंगा' वाचत असताना सूक्ष्मदृष्टी अभ्यासकाला त्या कवितेत आलेल्या प्रतिमा व भावसंकेत बींच्या काव्यात, इतरत्र, पण एका वेगळ्याच संदर्भात पुन्हापुन्हा आल्याचे तीव्रतेने जाणवते. बींच्या संपूर्ण काव्यसृष्टीच्या संदर्भात त्या प्रतिमांची अर्थनिश्चिती केली व त्याच्या अनुरोधाने पिंग्याचा अर्थ लावण्याचा प्रयत्न केला तर एक वेगळाच, काव्यपर, असा अर्थबंध कडव्या-कडव्यातून सुस्पष्टपणे गुंफला गेला असल्याचा साक्षात्कार होतो. स्वतः कवीने कवितेचा आशय स्पष्ट करताना तो अध्यात्मपर आहे असे

निःसंदिग्धपणे सांगितल्यावर त्यातून एक आणखी वेगळा अर्थ सुसंगतपणे निष्पन्न होतो असे प्रतिपादणे किती धाडसाचे आहे याची जाणीव मला आहे. काव्यगत स्पंदनशील प्रतिमांच्या वाच्यार्थाआड सूक्ष्म लक्ष्य व व्यंग्य अर्थाचे सलग प्रवाह वाहत असतात. क्वचित कवीला स्वतःला जाणीव नसताना त्याला अभिप्रेत असलेल्या आशयासोबतच वेगळेच अर्थबंध काव्यातून गुंफले जातात. त्या अर्थबंधाचे अस्तित्व सहृदय वाचकाला अचानक जाणवते व नवनवोन्मेषशाली प्रतिभेचा आविष्कारही किती नवनवोन्मेषशाली आहे याचा चैतन्यमय साक्षात्कार होतो. हे अर्थवैचित्र्य श्लेषात्मक शब्दरचनेमुळे निष्पन्न होऊ शकते. पण पिंग्यात व्यक्त होणारा दुसरा अर्थबंध शब्दच्छलातून निर्माण झालेला किंवा श्लेषात्मक नसून कवीच्या संपूर्ण काव्याच्या संदर्भात त्या काव्यातील प्रतिमांची, अर्थसंकेतांची व कल्पनांची अर्थनिश्चिती करून त्याच्या प्रामाण्यावर प्रतीत झालेला आहे, एवढे वाचकांनी लक्षात घ्यावे.

आधुनिक मराठी काव्याचे प्रणेते केशवसुत, टिळक, बी वगैरे मंडळींनी 'काव्या'लाच कवितेचा विषय केला. प्रा. रा. श्री. जोगांच्या मते याचे कारण 'कोणत्याही कवीस नवीन प्रकारचे काव्य लिहावयाचे असले की त्याला त्याचे समर्थन करणे आवश्यक असते व वाटते' ज्ञानेश्वरांनी केलेले मराठी-काव्याचे समर्थन सर्वविश्रुत आहे. केशवसुतांनी 'कवी व काव्य' या विषयावर पंधरा ते वीस कविता लिहिलेल्या आहेत. बी कवींची आधुनिक कवितेची तरफदारी सुप्रसिद्ध आहे. बींनीही या विषयावर विपुल कविता लिहिलेल्या आहेत. या कवितामध्ये त्यांनी ज्या विशिष्ट प्रतिमा, भावसंकेत व कल्पना वापरल्या आहेत थेट त्याच प्रतिमा व कल्पना यांनी पिंग्यात वापरल्या आहेत. हे विलक्षण-साम्य लक्षात घेतले तर कवीचे सर्जनशील मन, त्यातून उद्भवलेल्या भाववृत्ती, त्या वृत्तींची रसमयता व त्यांच्या विश्वाशी झालेल्या तदाकारतेतून निर्माण झालेली सविकल्पसमाधी व कवीला प्रत्ययाला आलेला आनंदाचा मोहर या पातळ्यांवर या कवितेतला आशय विकसित झाल्याचे जाणवते.

पहिल्या भागात कवीचे सर्जनशील मन, त्यातून झालेल्या वृत्ती, त्या वृत्तींची रसमयता यांचे वर्णन आलेले आहे.

नाचण मी मुळची मोठी
उद्भवल्या माझ्या पोटी
कोमल नवनीतापरिस
ज्योत्स्नेहुनि कान्ती सरस
दिक्रागाहून दिव्यतर
चंचल चपलेच्याही पर
वृत्ति गोरस्या अकलंकी
माय तशा झाल्या लेकी
प्रसन्न हृदयाच्या कोशी
असती सौरभरसराशी
त्यास लुटाया पोटभरी
वृत्ती झाल्या हो भ्रमरी
गोंगाटाला थांबविले
श्रवणमनाला कळुन दिले
कौशल्याची नवलाई
रस चोरुन प्याल्या बाई

'मी' म्हणजे कवीचे संवेदनशील मन. हे मन 'नाचण' आहे, नृत्यगीतशील आहे. 'आठवण' या कवितेत मनाच्या या 'नाचण' पणाचे वर्णन करताना बी म्हणतात, 'वाऱ्यावरुनी आल्या अवचित गीत-सुधेच्या धारा। चित्तमोर नाचला आपला उघडून पूर्ण पिसारा' चित्तमोराच्या नर्तनामागची प्रेरणा गीतसुधा आहे. नाचणपण व गीतस्फुरण यांचे कवीला अभिप्रेत असलेले साहचर्य सुस्पष्ट आहे.

नाचण मनाच्या पोटी गोरस्या अकलंकी वृत्तींचा जन्म झाला. या वृत्ती म्हणजे काव्यस्थ भावच होत हे या वृत्तींना कवीने लावलेल्या विशेषणावरून स्पष्ट करूया. कोमल नवनीतापरिस यावरून 'मार्दव'; ज्योत्स्ना, चंचल चपला दिक्राग यांच्याहून दिव्य म्हणजे 'कांती' व प्रसन्न हृदयाच्या कोशातील सौरभ-रसराशी प्राशन केल्यामुळे 'रसमयता' यांनी त्या वृत्ती युक्त आहेत. तात्पर्य या वृत्ती मार्दवयुक्त, कांतिमान व रसयुक्त आहेत.

आता 'निवेदन' या कवितेत चित्तातले भाव बळेच व्यक्त करू जाता काय होते याचे वर्णन करताना बी म्हणतात 'अपार्थिव जे संगूढ भाव चित्ती। व्यक्त संज्ञेने मात्र करू येती। स्पष्ट करता ते बळे, सर्व जाते। कांती मार्दव सौरस्य त्यातले ते', यावरून वृत्ती म्हणजे भाव हे स्पष्ट होते भावसौंदर्य बळेच









अनुक्रमणिका

स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला तर त्यातील गुणवत्ता नष्ट होते. म्हणजे भावसौंदर्य 'ध्वनी'त करण्यात खरी लज्जत आहे. हा ध्वनिसिद्धांताचा आशयच बींनी येथे सांगितला आहे.

भावांची कुशलतापूर्वक हृदयस्थ रसग्रहण करण्याची बींनी वर्णिलेली किमया व ज्ञानदेवांनी आपल्या श्रोत्यांकडून काव्यगत रसाचा आस्वाद घेताना अपेक्षिलेली आत्यंतिक हळुवारता यात विलक्षण साम्य आहे. ज्ञानदेव म्हणतात 'भ्रमर परागु नेती। परी कमलदल नेला नेणती।' त्याचप्रमाणे श्रवणमनाला कळू न देता वृत्तींच्या म्हणजेच भावांच्या भ्रमरी कवि-हृदयातील रसग्रहण करून 'रसमय' झाल्या.

तात्पर्य, सर्जनशील कविमनातून विविध भाव स्फुरले व ते हृदयातील रसाच्या आस्वादनाने रसपुष्ट झाले म्हणजेच भाव रसत्वालाच पोचले.

आता या कविमानसातील अमूर्त रसपुष्ट भाववृत्ती छंदवृत्ताच्या गोचर स्वरूपात व्यक्त होतात :

तो प्रमदांचा संभार
लोटुनी आला अनिवार
बळेच माझा धरुनी कर
मज केले वृत्त्याकार
धुंद नशा भरली नेत्री
जीवन मुसमुसले गात्री
लघुगुरुतेची कृत्रिम ती
पार उडाली मम भ्रांती.

रसपुष्ट भावांनी मनालाही भावसंकुल केले. मन एका अनिर्वचनीय शुद्ध चैतन्यानी उत्फुल्ल झाले. या उत्फुल्ल मनाच्या अभिव्यक्तीच्या आवेगात लघुगुरूच्या ताण्याबाण्यानी घट्ट गुंफलेल्या छंदशास्त्रीय नियमांचा तोल कवितेच्या चरणांना सांभाळता आला तरच नवल. भावनांनी उचंबळून आलेल्या कविमनाच्या अभिव्यक्तीत सहज स्वाभाविक छंदोमयता, तालबद्धता असते. ही नैसर्गिक तालबद्धता म्हणजेच ह्या कवितेचा स्वयंभू छंद. लघुगुरुच्या गणमात्रांचे गणित चुकले तर त्यासाठी आक्रोश करण्याचे काय कारण? 'कविवंदन' मध्ये बी म्हणतात, 'ऱ्हस्वदीर्घत्रैलोक्यी मात्राशास्त्री जी घेती। जुनी मापकोष्टके जगाची बाजूस सारा ती' काव्यानंद या कवितेत वृत्त्यंतर्गत टाकणे कठीणता, तद्रूपता पावणे। काव्यानंद रसप्रसंग मग हा निस्संग संभोगणे' असे मत त्यानी प्रगट केले आहे. लघुगुरुतेची कृत्रिम भ्रांती प्रतिभेच्या धुंद नशेत उडल्यावरच काव्यरसाचे निर्वेध पान शक्य आहे.

गणमात्रांची बळजोरी काव्यावर चालू नये असे बींचे मत होते. त्यानी आपल्या काव्यातही मात्रा-दोषांची फारशी पर्वा केलेली नाही. श्री. वा. ना. देशपांडे याना लिहिलेल्या २६ आक्टोबर १९४५च्या पत्रात 'यतिभंग, मात्रादोष माझ्या हातून निष्काळजीपणे झाले नाहीत. मला मात्रा कळत नाहीत, मात्रा मोजता येत नाहीत असे कसे बरे म्हणता येईल? एवढेच की, दुसऱ्या कशाच्यापेक्षा तरी मी त्याना जास्त महत्त्व देत नाही' असे ते लिहितात.

ही छंदमुक्तता समर्थनीय आहे किंवा नाही ही गोष्ट वेगळी पण कवीची वृत्ती गुरुलघुतेची कृत्रिम चौकट मानण्यास अनुकूल नाही. हे त्यांनी 'पिंग्या' तही स्पष्ट केले आहे.

## पिंगा अद्वैतरंगी रंगतो, त्याचे रहस्य

कवीची पद्धती समीकरणशील म्हणजे Synthetic असते असे कविवर्य तांबे म्हणतात. समीकरण या तत्त्वाचे तांब्यांनी पुढीलप्रमाणे विवेचन केले आहे: अनंत रूपाचे ठायी, अगणित वैचित्र्याचे ठायी एका दृष्टिक्षेपाने अद्वयाचे अवलोकन करणारे समीकरण होय. नानात्वातून एकत्वाची निर्मिती करणे हे कल्पनाशक्तीचे कार्य होय असे कोलरीज म्हणतो. 'पिंगा' अद्वयरंगी रंगतो याचे रहस्यही हेच आहे. बींनी पिंग्यात या एकत्वाचे, अद्वयाचे, समीकरण तत्त्वाचे भव्योदात्त वर्णन केले आहे :

अनेक नेत्रांचे बघणे
अनेक कंठांचे गाणे
अनेक चरणांचे जाणे
अनेक चित्तांचे स्फुरणे
दृष्टी वाणी गती मती
एकच येथुन तेथुन ती
प्रवाह बहुमुख जो होता
वाहे एकमुखे आता
वृत्तींचे बळ मज मिळता
विश्व सहज आले गिळता
तारा सारंगीवरल्या
सम सूरी लागून गेल्या











भूते आली साम्याला
मोहर आनंदा आला
विश्वबंधूता एकांगी
न पुरे माझ्या पासंगी
भूते मी मजला नाते
द्वैत कसे हे संभवते

कल्पनाशक्तीने कवी विश्वाशी तदाकार होतो. भूतांशी तो एकात्मता पावतो. विश्व गिळतो. विश्वाची अनुभूती घेतो. विश्वाशी एकरूप होण्याच्या त्याच्या क्षमतेवरच त्याच्या कलेची भव्यता व समृद्धता अवलंबून असते. 'फुलांची ओंजळ' या कवितेत कवी आणि सृष्टीच्या अद्वयाचे भव्योदात्त वर्णन बींनी केले आहे. ते लिहितात : 'सृष्टीशी कवि समरस झाला, प्राण तिचा आतला। हृद्कमळाची तिच्या कळाली फुलती मिटती कळा' इतकेच नव्हे तर 'कवीच झाला सृष्टी, सारी सृष्टी झाली कवि' एथपर्यंत त्यांच्या अद्वयाची सीमा येऊन पोचते.

सुप्रसिद्ध आंग्लकवी शेलेच्या शब्दांतूनही हेच तत्त्व ध्वनित होते. तो म्हणतो, he must put himself in the blace of another, and of many other, the pains and pleasures of his species must become his own' हेच भूते आणि कवी यांच्यातील अद्वैत होय.

कमालीचे तादात्म्य, सर्व वृत्तींचा संपूर्ण लय व या लयामुळे उत्पन्न झालेला ब्रह्मानंद (मोहर आनंदा आला) हेच कलेचे मर्म होय. हे डॉ. वाळिंबे यांनी आपल्या साहित्य-मीमांसा या ग्रंथात उद्धृत केलेले स्टिफन स्वाईग याचे मत पिंग्यातील अद्वयात्मक कलानंदावर प्रकाश टाकू शकेल.

कवीच्या मनाचे दुर्बलपण संपून ते बंधमुक्त झाले व अनुभूतीच्या विशाल अवकाशात झेपावू लागले.

दुर्बलपण पहिले गेले
क्षुद्रपणातून मी सुटले
जार्णबंध सारे तुटले
पिंगा माझा सोन्याचा
पंजर रत्नाचा त्याचा
पहा उघडले दाराला
पिंगा आकाशी गेला
पिंगा माझा अलौकिक
शोधुनि आला भूलोक
चारी खाणी मी वाणी
सांगीतले त्याने कानी
पिंगा स्वर्गाला गेला
भूवर घेउन त्या आला
आंग्रितली दडपून त्याला
नाच वरी म्या मांडियला
दानव मानव सुरासुर
मी, मजविण ते निःसार
मी येता उदयोन्मुख ते
जग तेव्हाची संभवते

प्रतिभेच्या चैतन्ययुक्त स्पर्शाने दुर्बलता, क्षुद्रपणा यांच्या बंधातून मुक्त झालेले विश्वाकार कविमन कल्पनेच्या गगनात झेपावले. 'प्रतिभा' या कवितेत आधुनिक मराठी काव्याचे आद्य आचार्य केशवसुत याच आशयाचे विचार व्यक्त करताना लिहितात : 'ती अत्युद्भुत गूढ शक्ती सहसा संचारता अंतरी। मुक्तात्मा गगनी उडे...... ' दुर्बलतेतून सुटलेला हा मुक्तात्मा कल्पनावकाशात स्वैर विहरू लागला. रत्नमय का होइना पंजर तो पंजर. या पंजराचा त्याग करून सुवर्ण पिंगापक्षी आकाशात गेला.

'काव्यानंद' या शीर्षकाखाली लिहिलेल्या काव्यपर कवितेत आलेली 'वृत्तींची रसलीन चंचल खगश्रेणी करी क्रीडन' ही ओळ आणि 'पिंग्या' मधील प्रसन्न हृदयाच्या कोषात असलेल्या सौरभरसराशी प्राशन करून 'रसलीन' झालेल्या 'मनाच्या वृत्ती' हाच 'खग' आकाशात विहरायला लागला ही कल्पना यांच्यातील विलक्षण साम्य लक्षात यावे. काव्यानंद ही कविता निर्विवादपणे काव्यपर आहे.

हा अलौकिक 'पिंगा' भूलोक शोधून आला. स्वर्गाला पृथ्वीवर आणून त्यावर नृत्य करू लागला. 'वेडगाणे' या कवितेत काव्य करणारी शक्ती थेट याच पद्धतीने अनंताची प्रदक्षिणा करताना दिसते 'उडुगणांच्या यानी। बसून विश्वाची राणी। अनंताची प्रदक्षणा करी-ग। जन म्हणे काव्य करणारी'

स्वर्ग धरेवर उतरण्याची कल्पना केशवसुतांच्या काव्यात वारंवार आली आहे. केशवसुतांच्या







काव्यविषयक मतांचाच अंगीकार बींनी केलेला आहे. ' कवि ' या कवितेत ' दृष्टी तो फिरवी वरी, तर लवे आकाश ते खालती ' ही कल्पना व ' स्वर्ग सवे धरेस उतरे ' ही कल्पना आणि पिंग्यातील स्वर्ग धरेवर उतरण्याची कल्पना यातील साम्य स्पष्ट आहे.

प्रतिभाशक्तीच्या अलौकिकत्वाचे वर्णन करणाऱ्या बींच्या ' वेडगाणे ' या नादमधुर काव्यात आलेली ' दिव्यभोगांच्या खाणी । गाय मनोमन वाणी ' ही कल्पना काव्यपर आहे हे स्वयंसिद्ध आहे. थेट हीच कल्पना, फक्त शब्दरचनेत किंचित बदल करून, पिंग्यात आलेली आहे ती अशी : ' चारी खाणी मी वाणी । सांगितले त्याने कानी'. यातील ' मी वाणी' हे निवेदन अत्यंत सूचक व महत्त्वाचे आहे. ' पिंगा ' मी वाणी आहे हे सांगतो. संपूर्ण वाङ्मय म्हणजे वाणीचाच विलास आहे. वाङ्मय या शब्दाची व्युत्पत्ती ' वाचो विकारः' अशी आहे. यावरून ' मी वाणी ' या निवेदनाचे स्वरूप व महत्त्व पिंग्याचा काव्यपर अर्थ लावण्याच्या प्रयत्नात किती आहे याची कल्पना यावी. मी ' वाणी' आहे हे निवेदन निःसंदिग्धपणे आल्यावर काव्यपर अर्थबंधाच्या निष्पत्तीबद्दल शंकाच राहू नये.

यानंतरच्या कडव्यात आलेल्या कल्पना व भावसंकेत इतके पारदर्शक आहेत की ह्यातून व्यक्त होणारा काव्यपर अर्थ रसिकांना सहज जाणवावा. बी लिहितात, ' मी येता उदयोन्मुख ते । जग तेव्हाची संभवते.' यातील जगसंभवापूर्वी उदयोन्मुख होऊन जगनिर्मितीची प्रेरणा देणारे तत्त्व कोणते हे अत्यंत स्पष्टपणे बींनी ' फुलांची ओंजळ ' या कवितेत दिले आहे. ते म्हणतात, ' काव्य अगोदर झाले । मग झाले जग सुंदर । ' प्रतिभा या कवितेत केशवसुतांनी प्रथम काव्य मग विश्वनिर्मिती हा क्रम सांगितला आहे. ते म्हणतात, ' शब्दब्रह्म ' उचंबळून दाही दिशा व्यापते ह्यातून जे भविष्यवाद निघतात ते ऐकून ' ब्रम्हयाने क्षमता नवीन रचना कार्यक्रमी लाभते. '

यानंतर शेवटी कलात्मक अद्वयाची समाधी सविकल्प असते. असे कवी सांगतो.

काय करु पण कसे करु  
मी पण माझे का विसरु

दिपकळी गे दिप्तीला  
सोड म्हणे का बुध तिजला  
म्लानपणाविण लावण्य  
क्षीणपणाविण तारुण्य  
मंगलमांगल्यायतन  
नित्यानंद निरावरण  
विश्ववैभवालंकरण  
मी—माझे ते स्वयंपण.

अद्वयाच्या या सर्वोच्च समाधी अवस्थेत चिरतरुण अम्लान लावण्यपूर्ण नित्यानंद ' मी 'पणा कवीला विसरता आला नाही. साहित्यसम्राट केळकरांनी या सविकल्प समाधीचे तत्त्व स्पष्ट करताना सांगितले आहे की "आपली तर भूमिका सोडावयाची नाही, पण बसल्याबैठकीत इतर भूमिकांचाही अनुभवानंद सेवायचा ही गोष्ट प्रतिभाच घडवू शकते. खरी सविकल्प समाधी उत्पन्न करू शकते ते वाङ्मय".

दीपकळीच्या दीप्तीसारखे कवीचे ' मी ' पण आहे. काव्य व कवीत ' तेजस्तत्त्व ' असते हे सांगताना प्रमीला या कवितेत ' राहे सत्कविकल्पनेत सविता तेजात जी दिव्यता ' असे बींनी म्हटले आहे. काव्यानंदमध्ये ते ' स्फुर्तिप्रभा ' अशी प्रतिमा वापरतात. केशवसुतांनी देखील कवीच्या संदर्भात ' धुमकेतु व महाकवि ' या कवितेत ' जडधातूंचे तुम्ही न दिसता तेजस्तत्त्वाचे ' असे म्हटले आहे.

' म्लानपणाविण-लावण्य ' असणारी वस्तू कोणती ? कविवंदन व काव्यानंद या कवितांमध्ये या चिरप्रफुल्ल तत्त्वाला 'प्रतिभा' असे म्हटले आहे. 'अम्लान प्रतिभा-कळ्या उमलल्या आहेत चोहीकडे ' काव्यानंद किंवा ' अम्लान प्रतिभेची लेणी लेववुनी ' - कविवंदन.

या संपूर्ण विवेचनावरून बी कवींनी त्यांच्या काव्यात वापरलेल्या कल्पना, प्रतिमा व भावसंकेत याची अर्थनिश्चिती करून त्याच्या साह्याने ' पिंगा ' या कवितेच्या अर्थाची उकल करण्याचा प्रयत्न केल्यास काव्यपर असा वेगळाच अर्थबंध सहृदय रसिकाला कसा गवसतो हे स्पष्ट होते.

कदाचित् काव्यानंद व ब्रह्मानंद यांचे सहोदरत्व असल्यामुळे ब्रह्मविवेचनातून काव्यविवेचनही सहजगत्या निष्पन्न झाले असेल.

---








प्रा. रा. ग. जाधव

# मराठी साहित्यसमीक्षेचे दृष्टिकोन [ १९२० ते १९४० ]

मराठी वाङ्मयातील निर्मितिप्रेरणा एकोणिसाव्या शतकाच्या अखेरच्या दोन शतकात स्पष्टपणे वेगळे वळण घेताना दिसल्या तरी, मराठी वाङ्मयविचाराचे पहिले ठळक स्थित्यंतर १९२० नंतरच्या काळातच घडले असे दिसून येईल. निर्मिति व समीक्षा यातील एवढे अंतर काहीसे स्वाभाविक वाटले तरी, नव्या साहित्याची अचूक अभिज्ञता असणारा समीक्षक मराठीला लाभला नाही हे खोटे नाही. एवढेच नव्हे तर या मधल्या काळात समीक्षेची निर्मिति विस्तार-दृष्ट्याही अल्प होती हेही लक्षात येते. तसेच पाहिले तर नव्या वाङ्मयाची किंबहुना खऱ्या अर्थाने वाङ्मया-तील 'नव्या'ची यथार्थ पारख करणारी समीक्षावृत्ति नवकाव्याच्या व नवकथेच्या अलीकडच्या काळातही दुर्मिळ आहे असे दिसते. मर्ढेकरांच्या काव्यातील आशयात आमचे समीक्षक नावीन्य शोधतात व जुन्या विठ्ठल कवीच्या कूटरचनेसारख्या असलेल्या कूटरचनेत नव-कवींची अभिव्यक्ति धुंडाळतात. टी. एस्. इलिअटने नमूद केलेली चांगल्या टीकाकार्याची कसोटी आमच्या कालच्या व आजच्या टीकेस लागू केली तर काय निष्पन्न होईल हे उघड दिसते : इलियट लिहितो : "The rudiment of criticism is the ability to select a good poem and reject a bad poem; and its most severe test is of its ability to select a good new poem, to respond properly to a new situation." – एवढे म्हणणारा टीकाकार तरी आमच्याकडे आहे काय? होता काय?

## तंत्रवादी टीकेचा जन्म आणि विकास

१९२० नंतर मराठी वाङ्मयविचारात जे नवे वळण दृष्टोत्पत्तीस पडते त्याचे स्वरूप थोडक्यात पाहिले पाहिजे : १९३५ या वर्षी, 'अर्वाचीन मराठी साहित्य' हा नेने-संपादित ग्रंथ व १९३७ या वर्षी श्री. वि. सी. सरवटे यांचा, 'मराठी साहित्य समालोचन' हा ग्रंथ; असे दोन ग्रंथ प्रसिद्ध झाले. वाङ्मयविचाराच्या दृष्टीने या दोन्ही ग्रंथांना मोठी अर्थपूर्णता आहे : या दोनही समालोचनपर ग्रंथात मराठी वाङ्मयाचा ऐतिहासिक पण प्रकारनिष्ठ विचार केलेला आहे. कथा, काव्य, कादंबरी, चरित्रे व प्रत्यक्ष टीका (!) यासारख्या साहित्यप्रकारांचा ऐतिहासिक मूल्यमापनाचा प्रयत्न या पुस्तकांतून आढळतो. या ग्रंथांच्या प्रवाहातच नंतरच्या काळात 'साहित्य-समालोचन', 'प्रदक्षिणा', 'मराठी साहित्य', 'वाङ्मयीन समालोचन' यासारखी ग्रंथ-रचना झाल्याचे दिसते.

या साहित्यप्रकारनिष्ठ समालोचनांचे वैशिष्ट्य तत्पूर्वीच्या भावे, भिडे, पांगारकर यांच्या ऐतिहासिक समालोचनपर ग्रंथांच्या पार्श्वभूमीवर अधिक उठून दिसते. भाव्यांना 'सारस्वताची रचना' अर्वाचीन मराठी साहित्याप्रमाणे करता आली नसती असे जसे नाही, तद्वतच नेन्यांना 'अर्वाचीन मराठी साहित्या'चे संपादन 'सारस्वता'प्रमाणे करता आले नसते असे नाही. म्हणजे असे की प्राचीन असो वा अर्वाचीन असो; पण मराठी साहित्य विविध प्रकारच्या लेखनाने समृद्ध होते. परंतु त्या विविध प्रकारांची प्रकट अभिज्ञता येण्यास काही वेळ लागला एवढेच ! वाङ्मयविचाराच्या विकासातील हे दोन कालोचित टप्पे होते हेही खरे !

वाङ्मयाच्या प्रकारनिष्ठ अभिज्ञतेचा [ Recognition ] उद्गम होण्यास जी अनुकूल परिस्थिती हळूहळू निर्माण होत होती, तिची चाहूल न. चिं. केळकरांच्या १९२१ सालच्या बडोदे साहित्य-संमेलनातील भाषणात लागते. [ आणि त्यांनी लिहिलेल्या अनेक पुस्तक-प्रस्तावनातून आढळते ! ] विशुद्ध कलावादाचा अर्थ एकतर केळकरांनी नीतिवाद व बोध-वाद याचा निषेध करून निषेधात्मक [Negative] स्वरूपाचा प्रसृत केला आणि दूषसाखरेचा किंवा









दुधातील साखरेचा गुलजार दृष्टांत सांगून आशय नि अभिव्यक्ति यांच्यातील द्वंद्वाचा नकळत पाया रोवला. पैकी पहिल्या सिद्धांताने मराठी वाङ्मय व समीक्षा यांचा काहीच ठळक फायदा तोटा झाला नाही पण दुसऱ्या विचारातील गर्भिताने तंत्रवादाचा जन्म झाला. म्हणजेही असे की ललित वाङ्मयाचा आस्वाद कलाशुद्ध रीतीने घ्यावयाचा म्हणजे नेमके काय करावयाचे हे न सांगता, केवळ काय टाळावयाचे एवढेच केळकरांनी 'हेतुसंशोधनाच्या गुप्त पोलिसाद्वारे' शोधून काढले. आणि मग मराठी प्रतिभा व रसिकता नकळत स्वतःसाठी त्या अनुत्तरित प्रश्नाचे उत्तर शोधावयास लागली. त्या दोहोंना मग केळकरांची दूध-साखर ही भेटली. आणि मग दुधाचे नाना प्रकार व पदार्थ व साखरेची नाना प्रकारची भेसळ यातच कलावादाचे रहस्य दडलेले आहे असे मानू लागली. केळकरानी या दृष्टीने पुढे प्रस्थापित होणाऱ्या तंत्रवादाला अनुकूल असे तात्त्विक अधिष्ठान नकळत निर्माण केले.

नेने सरवटे–आदींच्या ग्रंथाबद्दल वर केलेले विधान थोडेसे बदलून असे म्हणता येईल की, त्यातील वाङ्मयविचार विशिष्ट प्रकारच्या तंत्रवादाने प्रभावित झालेला आहे. १९३१ साली प्रा. फडके यांचे 'प्रतिभासाधन' प्रसिद्ध झाले. 'प्रतिभासाधन' हा ग्रंथ म्हणजे विशिष्ट प्रकारच्या तंत्रवादाचे बायबलच आहे. हा तंत्रवाद स्थूल, आशय–अबाधित, आणि महत्त्वाकांक्षी म्हणून विशिष्ट प्रकारचा असे म्हटले आहे. शिवाय या तंत्रवादाचा रोख आस्वाद नि मूल्यमापन यापेक्षा कलानिर्मितीशी निगडित असा वाटतो व म्हणूनच तो वाङ्मयविचाराच्या प्रगतीला काहीसा व काही काळ बाधक ठरला. याचे पुरावे आपणास नेने-सरवट्यांच्या व तत्समान इतर ग्रंथातील समालोचनात आढळून येतील. या ग्रंथातून खऱ्याखुऱ्या साहित्यतंत्राचा अभ्यास व त्या संदर्भातील खरेखुरे प्रश्न कोठेही आढळत नाहीत. साहित्याचे तंत्र, किंबहुना अभिव्यक्ति हा सनातन संशोधनाचा विषय आहे व त्यात गर्भित असलेले प्रश्न अनेक व अत्यंत गुंतागुंतीचे आहेत याची पुसटशीही कल्पना वर दिलेल्या कोणत्याही ग्रंथात एकाही स्थळी प्रकटपणे वा प्रच्छन्नपणे येत नाही. म्हणजे एकप्रकारच्या शबल तंत्रवादी समीक्षेने ते ग्रंथ भरलेले आहेत असे दिसून येते.

तंत्रवादाचे खरेखुरे कार्यक्षेत्र व इतिकर्तव्य कलानिर्मितीच्या टॉवरमध्ये नसून रसिकतेच्या खुल्या प्रासादात आहे. रसिकतेला सुजाण करण्यातच तंत्रवादाचे अवतारकार्य दडलेले आहे. दुर्दैवाने मराठीतील तंत्रवाद हा मराठी कलावंताच्या पोटी जन्मास आल्याने त्याला स्वतःच्या इष्ट कार्याचा विसर पडला व तो कलानिर्मितीच्या क्षेत्रात घुसून कर्तृत्वाचे न सापडणारे क्षितिज शोधू लागला. रसिकतेच्या किंवा वाङ्मयीन आकलन–आस्वादाच्या जगात तंत्रवाद जितका उपयुक्त व निर्धोक असू शकतो, तसा तो वाङ्मयीन निर्मितीच्या क्षेत्रात निर्धोक व उपयुक्त ठरत नाही. पण प्रतिभासाधनवादाने असा धोका नकळत पत्करला.

शिवाय गूढ वाटणारी आणखी एक गोष्ट तंत्राधीन कलावादाने केली : ती अशी की स्वतःच्या संदर्भात 'कलेतील आशयाशी निर्दय खेळ केला. आशयाला संपूर्ण झुगारून देण्याचे साहस जणू या तंत्रवादाला पेलले नाही.

केळकरांची दुधासाठी राखून ठेवलेली साखर स्वतःच्या बापाच्या पेंडीप्रमाणे या तंत्रवादाने वापरली, राबविली. मराठीतील तंत्रवादाचा हा विरोधाभास [ Paraclox ] जितका अनाकलनीय वाटतो, तितकाच संतापजनकही ठरतो. तंत्राधीन कलाविचाराने जगातील यच्चयावत आशयाशी केलेली वंचनामूलक चुंबाचुंबी अखेर 'कलेसाठी कला की जीवनासाठी कला ?' या लटक्या पण गाजलेल्या वादात परिणत झाली. मराठीतील हा वाद म्हणजे परस्परांना व स्वतःलाही फसविणाऱ्या प्रियकर-प्रेयसीच्या चुंबाचुंबीची एक बालिश प्रेमकथा आहे, असे म्हणावे लागते.

या तथाकथित वादाच्या अनुषंगानेच १९३० ते १९४० च्या दशकात वाङ्मयविचारात नाना वादांचे उद्गार उमटले : मानवतावाद, साम्यवाद, गांधीवाद, नवमतवाद, लिंगवाद, नीतिवाद यासारख्या वादांनी मराठी समीक्षा भरभरून गेली. तंत्राधीन कलावादाने भ्रामक कलामूल्ये समीक्षेत घुसडली नि मूल्याधीन कलावादाने आशयविषयक अराजक निर्माण केले. यामुळे महत्त्वाचा व मूलगामी वाङ्मयीन विचार या

वादावादीतून निर्माण झाला नाही आणि खरे म्हणजे तसाच एखादा महत्त्वाचा व मूलभूत अवाङ्मयीन विचारही त्यातून निष्पन्न झाला नाही. वादंगाची एवढी धूळ उडाली, पण वाङ्मयविचारांची एखादी पायवाटही स्वच्छ झाली नाही नि धूळ बसल्यानंतर पूर्वीच्या एखाद्या वाङ्मयविचाराच्या मळवाटेचे वळणही किंचित देखील बदलले नाही. एखादा ब्रॅडले किंवा एखादा ब्रॅडलेसारखा विचार या वादातून हाती लागत नाही. आज फडके, खांडेकर, जावडेकर, वामन मल्हार, माडखोलकर, कवीश्वर यांचे तत्कालीन समीक्षालेखन वाचताना ही उणीव प्रकर्षाने जाणवते. पुष्कळदा असेही वाटते, की या समीक्षकांना मनापासून वादच करावयाचा नव्हता. मनापासून वाङ्मयाची गंभीरपणे दखलच घ्यावयाची नव्हती. मनापासून वाङ्मय हे उच्च व गूढ विचारांचा विषय आहे असे वाटतच नव्हते. मनापासून ते वाङ्मयावर प्रेमच करीत नव्हते. किंबहुना वाङ्मयाचा मनापासून द्वेषही करीत नव्हते. धिक्कार करीत नव्हते. केवळ एका क्रीडावृत्तीने, लीलावृत्तीने ते वाङ्मयाशी व जीवनाशी (अर्थात वाङ्मयातून व वाङ्मयातीलच!) खेळत होते. क्रीडत होते. त्यांच्या वादांना वादविषय होण्याचे अधिष्ठानच नव्हते. त्यापैकी कोणालाच विपक्षाची गर्दन मारावयाची नव्हती. सर्कशीतील द्वंद्वयुद्धासारखे जणू एक द्वंद्वयुद्ध खेळून मराठी रसिकतेला रिझवायचे होते. त्यांचा संग्राम हा जणू लुटुपुटीचा संग्राम होता. यातही जे स्वतः लेखक होते, त्याना नकळत तंत्रवादाचे माहात्म्य पटले होते, जे स्वतः लेखक नव्हते, त्यांना जीवन हे वाङ्मयाच्या संदर्भात समजले नव्हते. एका अर्थाने सर्व लेखक हे प्रतिभासाधनाचे प्रकटपणे वा प्रच्छन्नपणे गुलाम होते आणि लेखक नसलेले पारंपरिक विचारांचे दास होते. वामन मल्हारांचा पायघोळ तात्त्विक वाङ्मयविचार हा तर उगाचच दोन्ही पक्षात वांझोटी विदुरनीति सांगत फिरत होता.

तंत्राधीन कलावादाच्या प्रभावाचे त्या काळातील एक गमक असे की 'काव्यकला', 'कथातंत्र', 'लघुनिबंध', 'नाट्यछटा', 'सुनीतादि काव्यप्रकार' 'लेखनकला' या किंवा यासारख्या विषयावर विपुल ग्रंथलेखन पंचविशी-चाळिशीच्या काळात झाले. प्रतिभासाधनवादाने नकळत केलेली ही काहीशी इष्ट गोष्ट होती. मराठी रसिकतेला तंत्रविषयक अभिज्ञतेचे पैलू पाडण्याचे काम अशा प्रकारच्या लेखनाने केले हे खोटे नाही. एवढेच नव्हे तर वाङ्मयविचाराच्या प्रगतीला या प्रकारचे लेखन हातभार लावत असते हेही खरे आहे. परंतु या तंत्रविषयक लेखनाचा सगळा रोख पुन्हा लेखकांकडे होता व हा प्रतिभासाधनवादाचा विघातक विजय होता. काव्य, कथा, कादंबरी या साहित्यप्रकारांचा विचार करताना तंत्राबरोबरच ज्या आशयविषयक घटकांचा सूक्ष्मपणे व सर्वंकषपणे विचार करणे भाग होते. किंबहुना साहित्यकृतीच्या अंगभूत एकात्मतेच्या संदर्भात तंत्र वा आशय यांचा विमर्श घेणे इष्ट होते तसा तो या लेखनात घेतलेला आढळत नाही. कदाचित आजच्या वाङ्मयीन कल्पना आजच्या स्वरूपात ३०।३५ वर्षांपूर्वी प्रचलित नसन तीलही! परंतु सुनीताचा विचार करणाऱ्या समीक्षकाने काव्याची यथार्थ कल्पना आधी मांडणे स्वाभाविक ठरले असते. साहित्याची यथार्थ कल्पना जणू त्या काळात गृहीतच धरली असावी.

१९२५ ते १९४० पर्यंतच्या काळातील वाङ्मयविचारात आणखी काही महत्त्वाचे प्रवाह आढळतात.

## संस्कृत साहित्यशास्त्राचा मराठी अवतार

मराठी वाङ्मयविचारात संस्कृत साहित्यशास्त्राचा जो प्रवाह आढळतो, त्याचा उगम १९३५ च्या आसपासच झाला. संस्कृत साहित्यशास्त्राचा मराठी अवतार नेमका कोणत्या गरजेतून झाला हे खरोखरच कळत नाही. मराठी वाङ्मयातील मूल्यशोधनासाठी तर उघडपणे तो झाला नाहीच. केवळ 'अथातो तत्त्वजिज्ञासा' या विशुद्ध ज्ञानैकदृष्टीने संस्कृत टीकाविचार मराठीत आणलेला असावा असे वाटते. गंमत अशी की, वाङ्मयदृष्टि नि ज्ञानदृष्टि या दोन्ही एक नाहीत हे अगदी कालपरवापर्यंत मराठीतील संस्कृतज्ञ विदग्ध पंडितांना माहीत नव्हते किंवा माहीत असले तरी मान्य नव्हते. कदाचित कोणी अशी शंका घेईल की संस्कृत टीकाविवेक हा खरे म्हणजे मराठीसाठी नाहीच; तो संस्कृतसाठी आहे. म्हणजे संस्कृत न येणाऱ्या मराठी रसिकांसाठी आहे. ही शंका केवळ तर्कशुद्ध आहे एवढेच! एरव्ही एका मृत भाषेच्या साहित्यविचारा-

साठी एवढी माया कुणाच्याही पोटी निर्माण होणे अशक्य वाटते.

दुसरी एक शंका आहे व ती काहीशी विचारार्ह वाटते. ती अशी की, प्राचीन मराठी साहित्य हे कळत व नकळत संस्कृत मूल्यविचाराने प्रभावित झाले होते. महानुभावांपासून मोरोपंतापर्यंत सगळ्या पंडित ( ? ) कवींची कविता संस्कृतातील रस, अलंकार, ध्वनि, वक्रोक्ति, औचित्य इत्यादि मूल्यकल्पनांची जाणीव ठेवून रूपास आणलेली आहे. आधुनिक काळातही चंद्रशेखरादि कवी मनाने त्या जुन्या काव्यविश्वातच वावरत असताना दिसतात. ही प्रचंड पंडिती निर्मिति नीटपणे आकलन करण्यासाठी संस्कृत काव्यविचार परिचित असणे इष्ट ठरते; व म्हणूनच प्राचीन वाङ्मयाच्या यथार्थ आस्वादासाठी व मूल्यमापनासाठी गीर्वाण टीकाविचार मराठीत आणला गेला.

वरील दृष्टिकोन बरोबर आहे, यात शंकाच नाही. प्रश्न इतकाच आहे की प्रा. द. के. केळकर, प्रा. रा. श्री. जोग, प्रा. के. ना. वाटवे, प्रा. म. वा. धोंड, प्रा. आगाशे, प्रा. बनहट्टी व प्रा. वाळिंबे यांचे ग्रंथ वाचत असताना या दृष्टिकोनाची प्रचीति येत नाही. या गीर्वाण समीक्षकांनी संस्कृत तत्त्वांचे उपपादन केले ते केवळ ओळख करून देण्याच्या माफक हेतूने ! काही उदाहरणे मराठी साहित्यातील दिली व जेथे तशी ती सापडली नाहीत, तेथे संस्कृत साहित्यातील उदाहरणे घुसडली. रसविचार किंवा अलंकारविचार यात काहीसे नवीन विचार शोधण्याचा किंवा कोंबण्याचा प्रयत्न केला पण यातही मराठी साहित्याचा जिवंत संदर्भ नव्हता. मराठी रसिकतेला तिच्या वाढत्या वयात जे पाहिजे होते ते असे होते. एकतर संस्कृत टीकाविचार मूळ स्वरूपात अनुवादित व्हायला पाहिजे होता. दुसरे म्हणजे प्राचीन मराठी साहित्य नेमक्या कोणत्या अंगात व कितपत प्रमाणात संस्कृत मूल्यांनी घडविले होते हे ! तिसरे म्हणजे उपलब्ध मराठी साहित्याच्या आशय-अभिव्यक्तीच्या स्पष्ट संदर्भात संस्कृत टीकेचा पुनर्विचार व्हायला पाहिजे होता !

—यापैकी एकही गोष्ट मराठी समीक्षकांनी केली नाही असे दिसेल. त्यांनी मराठीत आणलेला देवभाषेतील साहित्यविचार काहीशा बालसुलभ ( किंवा तरुणसुलभ ! ) उत्साहाने निर्माण झाला. चिकित्सक होऊ पाहणाऱ्या मराठी रसिकतेची गंभीरपणे दखल या समीक्षकांनी घेतली नाही असे वाटते. ओळखवजा लिहिलेली एकदोन पुस्तके लिहून हा बालसुलभ उत्साह थकला किंवा आत्मसमाधानात गर्क झाला. ' अभिनव काव्यप्रकाश ' वाचून जणू मराठी रसिकाने गप्प बसावे असेच या टीकाकारांना सुचवायचे असावे ! मराठी रसिक हा जणू बिगारीतला बाळू आहे अशीच त्यांनी सोयीस्कर कल्पना करून घेतली ! ' काव्यालोचन ' वाचून किंवा ' अभिनव काव्यप्रकाश ' वाचून किंवा 'रसविमर्श' वाचून मराठी (व संस्कृतही ) काव्याबद्दल व काव्यशास्त्राबद्दल मराठी वाचकाला काय व कितपत ज्ञान होते हा प्रश्न आज व कालही विचारण्यासारखा होता. मराठी वाङ्मयविचार या शाखेतही एका अपरिपक्व स्थित्यंतराच्या अवस्थेत उभा होता हे मग आपल्या लक्षात येते.

याचा पुरावा शोधायला नको : या काळातच रससंख्येवर वादंग माजला. ' क्रांतिरस ' हाही एक रस मानावा, ' भक्तिरस ' हाही त्यात समाविष्ट करावा असा पक्ष करण्यात आला : रससिद्धान्ताचे हे बालिश संस्करण होते हे उघडपणे लक्षात येईल. चमत्कारिक विस्मय वाटतो तो यासाठी, की या विद्वान् टीकाकारांना नवीन रस व रसनामे नेमकी कशासाठी हवी होती ? क्रांतिरसाची कविता निर्दिष्ट करून त्यांना काव्यविषयक जाणिवेचा नेमका कोणता प्रत्यय सूचित करावयाचा होता ? मुळातील रससिद्धान्त ज्या कलात्मक प्रत्ययाचा मागोवा घेत होता, त्या मोठ्या प्रश्नाचा या वादपटूंना विसर कसा पडावा ? का मराठी रसिकतेला कायमचे जुनाट व जसा कोणताही संबंध नसलेल्या संस्कृत टीकाविवेकात डांबून ठेवायचा त्यांचा प्रयत्न होता ? मराठी काव्याचा-क्रांतिकल्पना असलेल्याही काव्याचा—मराठी माणसाचा प्रत्यय हा स्वतंत्रपणे न्याहाळण्याचा प्रयत्न या रससंख्यावेड्या विमर्शकांनी का केला नाही ? याचे कारणही मला वाटते, एक प्रकारची ज्ञानाची प्रदर्शनप्रियता व कैफ एवढेच असावे.

दुसरा एक प्रयोग येथे नमूद केला पाहिजे. तो म्हणजे संस्कृतच्या धर्तीवर ' मराठीचे साहित्यशास्त्र ' उभारण्याचा ! डॉ. मा. गो. देशमुख यानी १९४०त








याच नावाचा ग्रंथ ( त्यांचा पी. एच्. डी. चा प्रबंध ) प्रसिद्ध केला. संस्कृतज्ञ किंवा संस्कृत साहित्याच्या वाचकांना हा प्रयत्न कौतुकास्पद वाटेल. पूर्वी म्हणे एकनाथांनी आपल्या मराठी भागवतरचनेला काशीच्या संस्कृतज्ञ पंडिताचे शिफारसपत्र मिळवून लौकिक साधला ! पांडित्याच्या व विदग्ध रसिकतेच्या या संस्कृती कल्पना कदाचित मराठीच्या साहित्यशास्त्र-कारावरही प्रभुत्व गाजवीत असाव्यात ! प्रस्तुत भगीरथ प्रयत्न मराठी रसिकतेला मराठी वाङ्मयाच्या संदर्भात कितपत उपयुक्त ठरला हा महत्त्वाचा प्रश्न आहे. या ग्रंथातील मूल्यविचार प्रत्यक्ष मराठी साहित्याच्या अभ्यासात वा मूल्यमापनात कोणी राबविल्याचे मला तरी माहीत नाही.

मराठी टीकेविषयींची केवळ आत्मीयता या ग्रंथाच्या प्रेरणेत नसून कदाचित संस्कृतशी बरोबरी करण्याची ईर्षाही असावी अशी शंका येते. [ डॉ. केतकरांनी अशी आकांक्षा व्यक्त केली होतीच ! ] मराठी वाङ्मय-विचाराची खरीखुरी गरज संस्कृत छापाचे साहित्यशास्त्र असण्यात नाही ही सूर्यप्रकाशाएवढी स्पष्ट वस्तुस्थिति आहे. कारण एवढेच की, मराठी साहित्याच्या प्रेरणा, परिस्थिति, रसिकवर्ग ही सर्वच संस्कृत साहित्याच्या त्या त्या गोष्टींहून विभिन्न आहेत. आणि संस्कृताप्रमाणे मराठीचे साहित्यशास्त्र बनणे शक्यही नाही व इष्टही नाही. सारख्या रूपाच्या माणसाची कुडी घेऊन त्यात आपल्या माणसाचे रूप नि चैतन्य कसे ओतता येईल ? असल्या प्रकारचे ओतकाम विचारक्षेत्रात व विशेषतः वाङ्मयविचारक्षेत्रात तर मुळीच चालण्या-सारखे नाही. आणखी एक महत्त्वाची वस्तुस्थिति अशी की, प्राचीन व अर्वाचीन मराठी साहित्य विपुल प्रमाणात आत्मनिष्ठेच्या प्रभावाने निर्माण झाले आहे. लेखककवींचे व्यक्तित्व प्रत्यक्षाप्रत्यक्ष रूपाने त्या साहित्यामागे सावलीसारखे उभे आहे. कालिदासाचे काव्य कालिदासाला विसरून (?) आस्वादता आले तरी आमच्या ज्ञानदेव-तुकारामाची कविता ज्ञानदेव–तुकारामांना विसरून यथार्थपणे आस्वादता येणारच नाही. आधुनिक मराठी वाङ्मय तर आत्मनिष्ठेने सर्वस्वी प्रभावित झालेले आहे. उलट संस्कृतसाहित्यशास्त्र वस्तुनिष्ठ बैठकीवर आधारलेले आहे ! 'कवीचे व्यक्तित्व ' ही संज्ञा किंवा या अर्थाची संज्ञा या साहित्यशास्त्रात कोठेही आढळणार नाही. हे जर खरे तर पृथक्करणप्रधान वस्तुनिष्ठ (आणि म्हणूनच व्याकरणाभिमुख झालेली संस्कृतातील मूल्यचर्चा–विशेषतः अलंकारप्रमेय !) अशा संस्कृत टीका-शास्त्राकडून मराठी वाङ्मयाचा व वाङ्मयविचाराचा अर्धा, अर्धवट व म्हणूनच विघातक फायदा होण्याची शक्यता ! परंतु हे मराठीच्या साहित्यशास्त्रकारांच्या ध्यानी आले नाही ! पुन्हा यापूर्वीचेच विधान करायचे तर संस्कृताभिमुख वाङ्मयविचार हा अननुभवी टीकावृत्तीच्या उंबरठ्यावरचा वाटतो हेच खरे !

## मराठी काव्याचे व्यवस्थापन झाले, पण मूल्य-संश्लेषण राहिले !

प्रस्तुत कालखंडात ( म्हणजे १९२० ते १९४०) ठळक प्रवाहाचे रूप यावे इतका पाश्चात्य टीकेचा मराठी अवतार झाला नाही. आधुनिक मराठी साहित्या-वर पाश्चात्य म्हणजे इंग्लिश साहित्याचा खूप मोठा परिणाम झालेला आहे हे उघडच आहे. पैकी आधुनिक मराठी काव्याचे टीकात्मक व्यवस्थापन करण्यात मराठी समीक्षकांना अधिक यश मिळाले असे दिसते. विशेषतः प्रा. रा. श्री. जोग यांनी हे कार्य केले; परंतु व्यवस्थाप-नाच्या कार्यातील दोषही मराठी काव्यसमीक्षेत यामुळे कायमचे निर्माण झाले. प्रा. जोगांसारख्या काव्य-व्यव-स्थापकांनी काव्यसमीक्षेची एक बिनकंगोऱ्याची चौकट निर्माण केली : कवीचे चरित्र व काहीसे चारित्र्य, काव्यलेखनाचा काळ, काव्यातील विषयांचे वर्गीकरण व त्यानुसार कवितांची वर्गवारी, मग या प्रत्येक वर्गा-तील काव्यांची ओळख [ Introduction ], पूर्व-कालीन व समकालीन कवींचे व कवितांचे प्रतिबिंब-दर्शन, मग संस्कृतातील रसांचा शोध व संस्कृतातील रीति व काव्यगुणांचा बोध व शेवटी स्थूलमानाने या कवीचे स्थान अशी ही शालीन बिनधक्क्याची चौकट आहे. या चौकटीत कवि नि त्याचे काव्य टाकले की काव्यविषयक खऱ्याखुऱ्या वादांना तोंडच फुटत नाही. काव्य म्हणजे काय व चांगले काव्य कोणते, काव्य-निर्मितीची प्रक्रिया कशी असावी, कवीचा प्रत्यक्षानु-भव नि त्याचे काव्यांतर्गत रूप यांचे सूक्ष्म नाते कसे असते, हे वा असले प्रश्न व्यवस्थापनात अप्रस्तुत ठर-तात. प्रा. जोगांनी आधुनिक मराठी कवितेचे ऐतहा-








ासक व्यवस्थापन केले पण आधुनिक मराठी कवितेचे मूल्यसंश्लेषण केले नाही. त्यांनी आधुनिक काव्य काहीसे समजावून दिले पण काव्याच्या स्थित्यंतरात निर्माण होणारे वाङ्मयीन प्रश्न मांडले नाहीत. वाङ्मयीन परिवर्तनाचा एवढा मोठा प्रयोग त्यांनी न्याहाळला; पण या पडझडीची प्रक्रिया विचारात घेण्याचे टाळून, एखाद्या सरळ व शालीन सुगरणीप्रमाणे अस्ताव्यस्त पडलेल्या काव्यवस्तू जबाबदारीने पुन्हा नीट गोळा केल्या व घरात नेटकेपणाने पुनः मांडल्या. प्रा. जोगांच्या काव्यसमीक्षेत शिरले की एका टापटिपीच्या दालनात शिरल्यासारखे वाटते. आणि मग या दालनात एके काळी प्रचंड उत्पात घडला होता असे चुकूनही जाणवणार नाही. व्यवस्थापन हे नाही म्हटले तर वरवरचेच, ते तळाशी जाणार नाही.

व्यवस्थापनात गुंतून पडलेली मराठी काव्यसमीक्षा मग नवकाव्याच्या स्थित्यंतराच्या काळी नवीनाची अभिज्ञता होण्यास अक्षम ठरली असल्यास नवल नाही. कारण काव्यातील नव्याजुन्याचे यथार्थ अवलोकन करण्याची सवयच या समीक्षेला लावली नाही, वा लागली नाही. नवकाव्य वाचून मग जे प्रश्न निर्माण झाले ते पुन्हा व्यवस्थापनाचेच, काव्यातील मूलतत्वांचे नाही! मराठीत मग सुबोधता म्हणजे काव्य व दुर्बोधता म्हणजे काव्य अशी ऐकान्तिक वादचर्चा सुरू झाली. म्हणजे पुन्हा हा वाद लुटुपुटीचा ठरण्याचा धोकाच निर्माण झाला.

या ठिकाणी १९२० नंतर निर्माण झालेल्या काव्यसमीक्षेचे १९४५ पूर्वीपर्यंतचेच स्वरूप प्रस्तुत आहे. ही काव्यसमीक्षा व्यवस्थापकीय स्वरूपाची होती. आणि हे व्यवस्थापन बऱ्याच प्रमाणात संस्कृत काव्यतत्त्वे व काही प्रमाणात इंग्लिश तत्त्वे यांनी प्रेरित झालेले होते. आजही शाळा-कॉलेजातून ही व्यवस्थापकीय काव्यसमीक्षाच शिकविली जाते. व्यवस्थापकीय समीक्षा नव्या वस्तु गोळा करते पण त्यांचे नवे संश्लेषण उभारू शकत नाही. ती भागाचा विचार करते, साकल्याचा विचार करत नाही. ती सारी नवीजुनी तत्त्वे वापरते पण त्या तत्त्वांचे 'perspective' लक्षात घेत नाही.

अशी ही काव्यसमीक्षा पुन्हा एकदा अननुभवी वाङ्मयविचाराचे अपत्य ठरते असे मला वाटते. पण चांगली समीक्षा ही नव्याचे मूल्यमापन व जुन्याचे पुनर्मूल्यमापन करण्याची प्रभावी साधने निर्माण करते. मराठी काव्यसमीक्षेत हे सामर्थ्य आहे काय याचा विचार प्रत्येकाने स्वतःशी करावा.

## कुमारवयीन अवस्थेतली टीका

याच काळात पी. एच. डी. साठी झालेले प्रबंधलेखनही बरेच आहे. या पदवीसाठी झालेले लेखन अनेक कारणांनी ठळक टीकाप्रवृत्तीचे दर्शन घडविताना त्यातील कुमारवयीन उत्साह व अपुरेपणा, गोंधळ नि अपरिपक्वता यांवरही प्रकाश पाडते. उदाहरण म्हणून डॉ. वा. भा. पाठक यांचा न. चिं. केळकरांच्या मार्गदर्शनाखाली तयार झालेला 'टीका आणि टीकाकार' हा प्रबंध पाहावा. यात मानसशास्त्र, सौंदर्यशास्त्र यांचीही वाङ्मयीन टीकासाधने विचारात घेतलेली आहेत. पण हा प्रबंध म्हणजे वाङ्मयाची हॉबी आहे किंवा हॉबीचे प्रबंधलेखन आहे. यात मोठ्या उत्साहाने व नेटकेपणाने वाङ्मयविचाराच्या वस्तु गोळा केल्या आहेत. साधारण सारखेपणा पाहून त्या विविध शीर्षकांखाली आल्बममधील चित्रांप्रमाणे समाविष्ट केल्या आहेत. पण या सर्व विचारसंग्रहातून विचारप्रक्रियाच अनुपस्थित आहे. एखादा विचारार्ह मूल्यविचार या सगळ्या खटाटोपातूनही हाती लागत नाही.

अलीकडे पदवीच्या प्रबंधलेखनाविषयी एकप्रकारचा अनुदारपणा व अवहेलनेची वृत्ति सुशिक्षित वाचकवर्गात निर्माण होत आहे. त्याच्या मुळाशी डोंगर पोखरून उंदीरही न काढणारी प्रबंधवाङ्मयाची विद्वन्मान्य अभ्यासपद्धति तर नाही ना, अशी शंका पुष्कळदा येते.

या काळातील टीकाप्रवृत्तींचे स्वरूप अधिक स्पष्ट होण्यासाठी मराठीतील टीकाकारांच्या टीकाकाराचे म्हणजे वा. म. जोशी यांचे वाङ्मयविचार लक्षात घेतले पाहिजेत. वरील विवेचनावरून मराठी टीकाविवेक एका कुमारवयीन (adolescent) अवस्थेत होता असे लक्षात येईल. प्रत्यक्षात विविध रूपाने होणाऱ्या साहित्यनिर्मितीच्या यथार्थ आकलनापेक्षा तिच्या उत्फुल्ल स्वागतासाठी तो अधिक गढून गेला होता. किंबहुना त्या विचारात एक प्रकारचे कुमारवयीन कुतूहल प्रभावी होते. बहुतेक समीक्षक हे स्वतः








लेखक असल्याने तर या कौतुकाचा पगडा अधिकच होता. प्रतिभासाधनामागील प्रवृत्ति ही स्वतःच्या प्रतिबिंबावर वेडावलेल्या नार्सिससची प्रवृत्ति नाही तर मग अन्य कोणती असणे शक्य आहे ? जे केवळ समीक्षक होते ( उदाहरणार्थ संस्कृत टीकाविवेक मांडणारे– ) तेही असेच स्वतःच्या असेल नसेल तेवढ्या टीकाज्ञानावर संतुष्ट होते. आत्मतुष्ट व आत्मरत अशा प्रवृत्तींनी या काळातील टीकालेखनाला प्रेरित केल्याचे दिसते. वाढत्या वयात येणारी तटस्थता व वस्तुनिष्ठता या काळातील कुमारवयीन प्रभावाखालील समीक्षकांना असाध्य होती. कुमारवयातील एखाद्या गोष्टीचे प्रेम वा द्वेष हे काहीसे 'impulsive' असतात, त्यामागे विवेकाची बैठक असत नाही, स्वतःच्या वृत्तिप्रवृत्तींचे प्रतिबिंब शोधणारी व सापडल्यास सुखावणारी व न सापडल्यास दुखावणारी अशी कुमारवयीन मनाची रीती असते. म्हणूनच विविध व विपुल साहित्यनिर्मितीच्या या कालखंडात टीका-प्रवृत्ति मात्र मागे राहिली. सर्जनप्रवृत्ति नि समीक्षा-प्रवृत्ति यांच्या मानसिक वयांत [ mental age ] तफावत पडली. म्हणूनच एका कुमारवयीन 'Formative' काळांतील हे टीकालेखन आज वाङ्मयीन उपयुक्ततेच्या दृष्टीने शून्यवत् ठरले आहे. कदाचित् ऐतिहासिक विकासक्रमात ही अवस्था स्वाभाविकही असेल, पण म्हणूनच तिला इतिहास निर्माण करणेही शक्य होते. पण तिने इतिहास घडविला नाही, तर इतिहासाने तिला घडविले. ती स्वकालाचे अपत्य ठरली.

कुमारवयीन टीकाविवेकाचा एक गमतीदार संघर्ष जाता जाता नमूद करून मग वा. म. जोशींकडे वळू ! १९४० च्या आसपास मराठीतील एकजात सर्व टीकाकारांना एकाएकी मराठी साहित्याच्या ऱ्हासाचे भयानक स्वप्न भेडसावू लागले : मराठी काव्य, मराठी कथा, कादंबरी या सर्वांचा अंतकाल अगदी समीप आला अशी बाधा आकस्मितपणे सर्वांना झाली. आणि मग प्रत्येकाने या आपत्तीचा अन्वय व अर्थ गंभीरपणाने लावण्याचा प्रयत्न केला. कोल्हे-कुईचा हा पोरकटपणा अन्य भाषात कधी झाला नसावा असे दिसते ! एखाद्या श्रीमंताच्या पोराने मोठ्या उत्साहाने स्वतंत्रपणे धंदा थाटावा आणि काही दिवस तो रगड नफ्यात चालला आहे या भ्रमात राहून एक दिवस किंवा एका रात्री एखादे भयानक पण सूचक स्वप्न पडून सगळा धंदा बुडाल्याची आवई देत उठावे; तसलाच प्रकार मराठी वाङ्मयाची पिछेहाट झाली या आक्रोशात घडला असावा. यातली पोरकटपणाची गंमत एवढीच की मराठी वाङ्मयाची संपन्नता ही जशी नीटपणे या कुमारवयीन समीक्षकांना समजली नाही, तशीच त्याची विपन्नता म्हणजे काय हेही बिचाऱ्यांना उमगले नाही. केवळ अननुभवी वाङ्मयवृत्तीने त्यांची दोन्ही बाबतीत दिशाभूल केली व तारांबळ उडविली एवढेच ! याचा अर्थ मराठी साहित्य या काळात संपन्नतेच्या व विपन्नतेच्या आवर्तात सापडलेच नाही असा नाही. पण टीकेचे या बाबतीतील उत्तरदायित्व तिला झेपले नाही असे म्हणावे लागेल. याचे गमक याच काळात झालेल्या, 'मराठीत महाकाव्य का निर्माण होत नाही ?' या विषयावरील चर्चेत आढळेल. आज विविध समीक्षकांची या विषयावरील चर्चा वाचताना तीमधील पोरकटपणा–उथळपणा लक्षात येतो. विसाव्या शतकात महाकाव्याची खरोखरच गरज आहे काय व असल्यास तिचे निश्चित स्वरूप कोणते हा मूलगामी प्रश्न एकाही वादपटूने उपस्थितही केला नाही. दुसरे एक उदाहरण म्हणजे माधव ज्यूलियनांच्या 'विरहतरंगांची तुलना कालिदासाच्या 'मेघदूताशी' करून त्यास 'मेघदूताहूनही' श्रेष्ठ मानण्याचा प्रयत्न ! या प्रयत्नातले मर्म एवढेच की या प्रयत्नामागे मराठी काव्याच्या प्रेमापेक्षा व गुणापेक्षा संस्कृत काव्याचे प्रेम व गुण हेच वरचढ होते ! मेघदूताची फूटपट्टी हवीच कशाला ? –पुन्हा एका कुमारवयीन उत्साहाची ही आत्मवंचना होती असेच दिसून येईल.

## तत्त्वज्ञानप्रीतीची भूक भागविण्यासाठी वाङ्मयविचार

वामन मल्हारांकडे वळताच ते टीकाकारांचे टीकाकार होते हे चटकन लक्षात येते : त्यांनी त्या काळातील न. चिं. केळकर, प्रा. ना. सी. फडके व नंतर बा. सी. मर्ढेकर यांच्या विचारप्रणालीवर टीका लिहून वरील पदवी संपादन केली. माझ्यासारख्याला ही पदवी आज त्यांचे टीकालेखन वाचताना 'तुझे आहे तुजपाशी' मधील आचार्यांच्या पदवीप्रमाणे निंदा-

व्यंजक वाटते. कारण टीकाकार्यातील सर्वात मोठी फसगत वामन मल्हारांची झाल्याचे दिसते : ती म्हणजे टीका-व्यापार हा वाङ्मयाच्या प्रेमातून, अवलोकन-आस्वादातून झाला पाहिजे. विचारांच्या किंवा तत्त्वज्ञानाच्या प्रेमातून वा अवलोकन-आस्वादातून नव्हे. टीकेवर टीका करणारा हा पुष्कळदा मुळ वाङ्मयापासून दोनदा लांब जातो. एकदा टीकेपुरताच विचार करताना व एकदा स्वत : टीकालेखन सजविताना ! व म्हणून त्याची टीका ही महाभारतातील कृष्णनीतिप्रमाणे प्रेरक व उपयुक्त न ठरता, त्यातील विदुरनीतीप्रमाणे वांझोटी ठरते. संशयवादाकडे ती अटळपणे झुकणारच ! कारण जिवंत वाङ्मयाच्या निरपेक्षतेने केलेला संदर्भशून्य टीका-विवेक तर्कशुद्ध पर्यायाच्या चक्रव्यूहातून बाहेर पडणेच शक्य नाही. अटी घालण्याचे काम मग हा टीकाविवेक अटीतटीने करू लागतो. आणि सर्वात महत्त्वाची उणीव म्हणजे वाङ्मयीन प्रश्नांचे नेमके उगमस्थान लक्षात न घेतल्याने असा टीकाविवेक तात्त्विक विचारांची रुक्ष विधानसंहिता ठरते.

पण वामन मल्हारांनी हौसेने व आपल्या तत्त्वज्ञान-प्रीतीची भूक भागविण्यासाठी वाङ्मयविचार केला. टीकाकारांवरील त्यांच्या टीकेची शहानिशा येथे करायची नाही. मराठी टीकाविवेकाच्या एका विशिष्ट काळखंडाशी त्यांची टीकाप्रणाली कशी निगडित झाली आहे एवढेच येथे प्रस्तुत आहे. आत्मदर्शना-साठी आसुसलेल्या या काळातील टीकाप्रवृत्तींचा प्रभाव वामन मल्हारांवरही पडलाच. म्हणून तर कादंबरीतील चर्चा व वादविवाद यांचे त्यांनी समर्थन केले. [ पात्रे विचारी व विवादपटू असतात व म्हणून कादंबरीत चर्चा येणे स्वाभाविक आहे. एवढा सरळ व सरधोपट युक्तिवाद या पुण्याच्या 'प्लेटो'ने करावा याची गंमत वाटते ]. वाङ्मय कालनिष्ठ की व्यक्तिनिष्ठ याचा विचार करतांना त्यांनी परिस्थितिवादाचीच ( ? ) अधिक चर्चा केली. विविध ज्ञानशाखा परिचित असलेल्या या टीकाकाराने विचारविलासाची हौस आपल्या टीकालेखनात भरपूर प्रमाणात भागवून घेतली. विचार मग त्याचे 'सौंदर्य' असो, वा 'विहार' असो किंवा 'विलास' असो, पण त्याशिवाय वामन मल्हारांचे समाधान होणेच शक्य नव्हते.

यात आक्षेपार्ह एवढेच की तत्त्वज्ञानातील– तेही भारतीय वेदान्तातील– परिभाषा, संज्ञा, विचार, युक्तिवाद या साऱ्यांनी त्यांचे टीकालेखन जडावून गेले आहे. व म्हणून त्यांचे टीकालेखन वाङ्मयाच्या अभ्यासकांपेक्षा तत्त्वज्ञानाच्या विद्यार्थ्यालाच अधिक उपयुक्त ठरते. प्राचार्य भाटे यांनी म्हटले आहे : "अशा तऱ्हेने ज्या कामाकरिता वामनराव विशेष प्रकर्षाने योग्य होते, ते तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापकाचे काम त्यांना मिळाले नाही आणि मराठीचे प्राध्यापक होण्यातच संतोष मानून त्यांना राहावे लागले. "प्राचार्य भाटे यांनी न सांगितलेला वा. म. जोशींचा संतोष-प्राप्तीचा दुसरा एक मार्ग म्हणजे त्यांचे टीकालेखन !

याला एकच पुरावा देतो : 'वाङ्मयाची प्रवृत्ति व ध्येये' हा त्यांचा 'विचार सौंदर्या'तील लेख पाहावा. ज्या प्रवृत्तींचे व ध्येयांचे विवेचन या लेखात आहे, त्यांचा संबंध वाङ्मयाशी किती नि माणसांशी किती हे प्रत्येकाने ठरवावे ! वामन मल्हारांनी वाङ्म-याला तात्त्विक चर्चेचे साधन बनविले. वाङ्मयातून एखादे तत्त्वज्ञान शोधून काढण्याऐवजी तत्त्वज्ञानातून वाङ्मयाची एक भ्रामक ( pseudo ) विचारप्रणाली संकलित केली. वाङ्मयाच्या उच्चतम ध्येयांची त्यांची घोषवाक्ये वाचताना पंतोजींच्या सुभाषितांची आठवण होते. 'सत्य', 'शिव' व 'सौजन्य' ही शाब्दिक मूल्यकल्पना प्रसृत केली. आणि वाङ्मयातील खऱ्या-खुऱ्या सत्याचे, शिवाचे नि सौजन्याचे ( ? ) कूट-प्रश्न चक्क वगळून टाकले.

१९२० ते ४५ च्या दरम्यान् प्रचलित असलेल्या मंत्रवादी टीकेचे प्रतिनिधी म्हणजे वा. म. जोशी, पण त्यांच्या मंत्राधीन टीकेतही कुमारवयीन प्रवृत्तीची तीच प्रतिबिंबे आढळतात. तत्त्वज्ञानाच्या आधारे वाङ्मयीन टीका करता येते, नाही असे नाही. पण तिचे स्वरूप वामन मल्हारी संज्ञाप्रधान, दृष्टांतात्मक नि सरधोपट पद्धतीपेक्षा निश्चितच निराळे असते. मुळात तत्त्वज्ञानाभिमुख टीका ही वाङ्मयाच्या साकल्यात्मक अवलोकनातून, सातत्याच्या अनुभूतीतून नि वाङ्मयावरील उदंड प्रीतीच्या पोटातून निर्माण होते. तात्त्विक किंवा मंत्राधीन टीकाकाराला आवश्यक असलेली एकसंध व्यक्तित्वाची देणगी कदाचित वा. म. जोशींना लाभली नसावी. त्यांनी कादंबऱ्या लिहिल्या त्या







विचारांच्या प्रीतीतून व प्रदर्शनापायी! आणि टीका लिहिली तीही विचारप्रेमातूनच! कुमारवयीन उल्हास व उत्साह यांच्या प्रभावानेच जणू वाङ्मयलेखनाला व टीकालेखनाला वामन मल्हार उद्युक्त झाले! वाङ्मयाचे तत्त्वज्ञान वेदान्तात कसे सापडणार? वाङ्मयाचे मंत्र ऋग्वेदात कसे सापडणार? वाङ्मयाच्या प्रवृत्ती या भगवद्गीतेतील प्रवृत्तीहून खास वेगळ्या आहेत. वामन मल्हारांच्या टीकेने वाङ्मयातील माणसे व समाज हा तत्त्वतः अस्तित्वात असलेला घटक निवडला व तो तत्त्वज्ञानाच्या रेडिमेड चौकटीत बसविण्याचा यत्न केला. परिपक्व तात्त्विक टीकाप्रवृत्तीचे हे निश्चितच लक्षण नाही. म्हणून वामन मल्हारांची तात्त्विक किंवा मंत्राधीन टीका ही कुमारवयीन अवस्थेची द्योतक ठरते.

## कालच्याकडून आजच्याकडे

१९२० नंतरच्या काळात मला ज्या ठळक टीकाप्रवृत्ति रूपास आलेल्या दिसल्या, त्यांचे काहीसे दिग्दर्शन येथवर केले. मला वाटते की १९४५ नंतर म्हणजे नवकाव्य, नवकथा इत्यादींच्या कालखंडांत मराठी टीका बदलू लागली. आजच्या काळात टीकालेखन करीत असताना ज्या पूर्वकालीन परंपरेचा संदर्भ आवश्यक असतो, तो शोधण्याचा प्रयत्न मी किंवा माझ्यासारखा कोणीही करीत असतो. या पूर्वकालीन परंपरेत विचारविनिमयाला योग्य असे काही टेकू मिळतात की काय हे पाहत असताना निदान माझी तरी अनेकदा निराशा झाली. मराठीतील ही पूर्वकालीन समीक्षा कोणत्या perspective मध्ये यथार्थपणे व साकल्याने समजू शकेल असा माझा प्रयत्न होता. विचारान्ती जे लक्षात आले ते यापूर्वी मांडलेले आहे. त्याच्या निष्कर्ष पुन्हा एकदा नमूद करायचा तर असे म्हणावे लागेल की १९२० ते १९४५ या काळातील मराठी तंत्रवादी, शास्त्रवादी, मंत्रवादी, प्रबंधवादी व व्यवस्थापनवादी टीका ही मूलतः एका अपरिपक्व अशा कुमारावस्थेत (adolescent) होती. म्हणून तिचे स्वरूप समजले, त्याचे समर्थन करता आले, ऐतिहासिक दृष्टीने त्याची कालोचितता लक्षात घेतली, तरी वाङ्मयाच्या खऱ्या समस्यांना तिने कधीही वाचा फोडली नाही असे दिसेल. अशा या परंपरेने प्रारंभ करून आजच्या टीकाकारांचे आजचे प्रश्न मांडणे शक्य नाही व ते तसे विद्वत्ता दाखविण्यासाठी मांडले, तर सगळीच चर्चा पुन्हा वरवरची, उथळ व अपरिपक्व ठरण्याची भीती आहे. हे एवढे समजणे म्हणजेही एक प्रकारची उपयुक्तता आहे. व कोणतेही समीक्षालेखन अखेर वाङ्मय किंवा टीका या दृष्टीने उपयुक्त असले तरच समर्थनीय ठरते. 'सत्यासाठी सत्य' किंवा ज्ञानासाठी ज्ञान असला वांझोटा ज्ञानयोग समीक्षाक्षेत्री निष्फळ ठरतो.

आजच्या टीकालेखनाला कालची परंपरा आहे पण ती उपयुक्त नाही, म्हणून आजचे टीकालेखन परिभाषेपासूनच नाना समस्यांनी व्यग्र झाले आहे एवढे उद्बोधन ज्या वैचारिकाने मला झाले, ते वरील लेखात नमूद केले आहे.

---



अनुक्रमणिका

## पत्रव्यवहार–

(१)

संपादक नवभारत यांस –
सा. न. वि. वि.

फार्सी-अरबी शब्दांबद्दल पत्रव्यवहार वाचला. संपादकीय टीप देऊन यातील खुलासा अधिकृत व्हावयास हवा होता असे मला वाटते.

कुमैत, कुमाईत, ही घोडयांची एक जात. राजव्यवहारकोशात "चतुरंग" वर्गात हा शब्द येतो.

श्यामल: तु कुमैत: स्यात् (१६४)

कुवैत ह्या सध्या भूमिगत तेलासाठी विख्यात असलेल्या ठिकाणाहून पूर्वी "अरबी" घोडे येत. कुवेती– कुवैती– कुमैती असा त्यांचा विपर्यास झालेला दिसतो.

"बोर" ह्या शब्दाबद्दल इतका वाद का निघावा कळत नाही. बोरे आपण खातो– ती पिकली म्हणजे त्यांचा रंग (लालसर) दिसतो. त्या रंगाचा घोडा तो "बोर" घोडा. हा शब्द अरबी-फार्सी ते सांगता येत नाही. व्युत्पत्तिकोश-कार "बोर" = लाल रंगाचा खडा (रत्नविशेष) असाही यादवकालीन अर्थ देतात. राजव्यवहारकोशात बोर = शोण: असा पर्याय सांगितला (चतुरंग वर्गात) आहे.

ताजी ही सुद्धा घोडयांची जात. राजव्यवहारकोशात ताजीचा अर्थ मद्रज: (१६७) मद्रदेशीय (घोडा) असा दिला आहे. शिवाय

गिर्द=वेष्टनं (१८६) (सामंतवर्ग)
गुर्दा = वज्रं (११६) (शस्त्रवर्ग)

असे शब्द राजव्यवहारकोशात आढळतात.

बदरीखा हा शब्द (अरबी-फार्सी?) कुठला ते ठाऊक नाही. परंतु राजव्यवहारकोशात बार्दरख्त (? बार् + दरख्त) याचा अर्थ फलद्रुक्ष (३४६) फळझाड. (दरख्त = द्रख्त = झाड)

हे अर्थ ग्राह्य होण्यास हरकत नसावी.

**– श्री. श्री. रा. टिकेकर**

(२)

संपादक 'नवभारत' यासी– स. न. वि. वि.–

'मे' च्या अंकातील प्रा. सोवनी यांचा होळकर देणगी प्रकरणावरील लेख व त्याला जोडलेला पत्रव्यवहार वाचला. हे प्रकरण एक नीट न उलगडणारे कोडेम्हणूनच शेवटपर्यंत राहील अशीही शक्यता आहे. आता काही कागदपत्र अचानकपणे सापडून त्यातूनच या प्रकरणावर काही नवा प्रकाश पडला तर पडावयाची शक्यता. तसे काही कागद होळकरांच्या दफ्तरात मिळण्याची शक्यता असावी. गोष्ट छोटी असली तरी संबंध मोठयांचा असल्यामुळे कुतुहल मोठे आहे. त्यामुळे तसा प्रयत्नही होण्यास हरकत नाही. या दफ्तरातील कागदपत्रावरून खालील गोष्टींचा खुलासा कदाचित् होऊ शकेल.

(१) टिळकांनी गुप्ते यांना पत्र लिहिले काय? लिहिले असल्यास त्याचे पुढे काय झाले?

(२) ७०० रु. च्या देणगीची नोंद होळकरांच्याकडे कोणत्या तपशीलाने झाली?

(३) पुस्तकांच्या तीनशे रुपयांच्या पावतीचे काय झाले? ती ७०० रुपयातील चारशे रुपयाच्या पुरस्कारापोटी जमा झाली काय? की स्वतंत्रपणे जमा झाली? की आगरकरांच्याकडे परत आली?

(४) 'वाक्यमीमांसा' या पुस्तकाला पुरस्कार म्हणून ४०० रुपये दिल्याचा हुकमात उल्लेख आहे. यात २५० प्रती देण्याचा संबंध कोठे येतो? निदान 'विकारविलसिता' च्या २५० प्रती देण्याचाही यात अंतर्भाव कसा होतो? 'विकारविलसिता'च्या या प्रतींच्या व्यवहाराची नोंद कशी झाली?

(५) आगरकरांच्या विषयी महाराजांचा विशेष लोभ असला तरी पुस्तकखरेदीतून आगरकरांच्या मनासारखी उचित व्यवस्था होणे शक्य असताना ७०० रु. च्या देणगीतून ४०० रु. इकडे देण्याचा परपस्पर मार्ग का स्वीकारण्यात आला? यात महाराजांना सल्ला देणाऱ्यांनी काही चूक अनवधानाने किंवा दरबारी सावधानतेने केली काय?

हे कोडे शेवटी कसेही उलगडले किंवा उलगडले नाही तरी मोठी माणसे असली तरी ती अखेर माणसेच असतात एवढे या प्रकरणातून पुन्हा एकवार मनावर ठसते. दोघेही मोठे असले तर निदान इतका कीस काढला जातो. एकजण छोटा असला तर 'देवो दुर्बलघातक:' या न्यायाचाच निर्णय अशा प्रकरणी लागण्याची शक्यता अधिक असते.

एकाच ध्येयाने काम करणाऱ्या त्यागी ध्येयवादी माणसातही आंतरिक सौहार्द उरले नाही की एकमेकांना समजून सांभाळून घेण्याची वृत्ती रहात नाही व तान्त्रिकतेच्या कर्कश कैचीत सहकाऱ्यांच्या स्वाभि-

मानाचा, प्रतिष्ठेचा, सत्वाचा बळी घेताना काही वाटेनासे होते. साधे सरळ वृत्तीचे सहकारीच यामुळे अडचणीत येतात असे नसून संपूर्ण संस्थेचे अस्तित्वच धोक्यात येते. गुप्ते यांना आगरकरांनी टिळकांच्या सूचनेप्रमाणे पत्र लिहिणे ( वाटल्यास काही रचनेचा फेर करून ) खरोखर उचित होते. परंतु टिळकांनी त्र्यंबकराव जोशी यांना दिलेल्या लेखी व तोंडी सूचना जाणूनबुजून आगरकरांचा अधिक्षेप करणाऱ्या व त्यांच्या दानतीविषयी अविश्वास प्रकट करणाऱ्या होत्या. यामुळेच अशा दडपणाखाली उचित ते करणेही आगरकरांना अपमानास्पद व अनुचित वाटले यात नवल नाही. टिळकांनी ही कर्कश कैंची त्यावेळी वापरली हे तर दुर्दैव खरेच परंतु त्यानंतरही त्यानी या गोष्टीविषयी कधीही खेद व्यक्त केला नाही हे त्याहूनही मोठे दुर्दैव होय.

– देवदत्त दाभोळकर

---

## पुस्तक-परामर्श

**'आअिन्स्टाईनचे नवे विश्व'***

रिलेटिव्हिटी किंवा सापेक्षतावादावर अिंग्रजीत अनेक पुस्तके असली आणि प्रत्यही त्यात भर पडत असली तरी मराठीत या विषयावर फारच थोडी पुस्तके आहेत. त्यातून सामान्य वाचकांसाठी लिहिलेली तर एक दोन पुस्तके असतील नसतील. श्री. वा. ज. खेर यांचे 'आअिन्स्टाअिनचे नवे विश्व' हे पुस्तक वरवर चाळले तरी त्याचे वैशिष्ट्य लक्षात येते. मधून मधून असलेली किंचित् व्यंगचित्रे, आपल्या अगदी परिचयाची उदाहरणे, संतवचने पाहून तर पुस्तक फारच आकर्षक वाटते.

पुस्तकाच्या अंतरंगाकडे वळण्यापूर्वी थोडे विषय-विवेचन अप्रस्तुत ठरणार नाही. 'सापेक्षता' हा विषय दोन दृष्टींनी अवघड म्हटला पाहिजे. एक तर सापेक्षतावादाचा मूळ सिद्धांत अत्यंत क्लिष्ट व त्यावेळपर्यंत तरी अगदी एकांडचा समजल्या जाणाऱ्या गणिती भाषेत सांगितलेला होता. मानवाच्या स्थल-कालविषयक कल्पना पार बदलून टाकणारा व विश्वाच्या गवसणीला हात घालणारा हा सिद्धांत मुळात अवघ्या पाच पृष्ठांवर लिहिलेला आहे ! त्यामुळे मोठमोठ्या विद्वानांनाही हा विषय अगम्य वाटतो. परंतु हा विषय अवघड वाटण्याचे खरे कारण दुसरेच आहे. शतकानुशतके माणसाने ज्यांवर अनन्यसाधारण श्रद्धा व विश्वास ठेवला ती शाश्वतमूल्येच या सिद्धांताने डावलून टाकली आहेत. पदार्थाची जागा, त्याची गती, त्याचे वस्तुमान या गोष्टी अितक्या सरावाच्या आणि मूलभूत आहेत की त्यांची व्याख्या (!) करावी लागेल हे मोठमोठ्या शास्त्रज्ञांनासुद्धा आवश्यक वाटले नाही. विशेषतः 'काल सापेक्ष असतो' ही कल्पनाच विचित्र वाटते. 'सापेक्षतावाद' समजणारी माणसे फारच थोडी असण्याचे हे एक प्रमुख कारण आहे. आअिन्स्टीन हा अेका दृष्टीने कोपर्निकस, गॅलिलिओ आणि न्यूटन यांचा वारस असला तरी त्याच वेळी तो लॉक, बर्कले आणि ह्यूम यांचाही उत्तराधिकारी आहे. त्या दृष्टीने तो शास्त्रज्ञ आणि तत्त्वज्ञ होता. भौतिक शास्त्रे आणि तत्त्वज्ञान यातील अद्वैतच त्याने दाखविले. मात्र त्यामुळे त्यांनी अेकाच वेळी वरील दोन्ही गटांचा रोष ओढवून घेतला. त्याला मिळालेले नोबेल पारितोषिक सापेक्षतावादाबद्दल मिळालेले नाही हे मुद्दाम लक्षात घेण्यासारखे आहे !

'सापेक्षतावाद' स्पष्ट करण्यापूर्वी श्री. खेर यांनी 'सापेक्ष' म्हणजे काय हे सांगितले आहे. पुढे-मागे, डावी-उजवी, खाली वर, हे सारे शब्द सापेक्ष आहेत हे उघड आहे. अशा प्रकारे साध्या सोप्या उदाहरणांनी गहनातिगहन कल्पना स्पष्ट केलेल्या असल्यामुळे पुस्तक फारच सुबोध झाले आहे. मात्र ही ज्ञाताकडून अज्ञाताकडे जाण्याची पद्धत काही ठिकाणी फारच लांबली आहे. अर्थात् लेखकाने समोर ठेवलेल्या वाचकाच्या दृष्टीने तसे करणे आवश्यक असेल. एकदोन ठिकाणी मात्र या उलट झालेले आहे. उदाहरण द्यावयाचे झाल्यास 'गतिविचार' या प्रकरणातील प्रभाकरपंत-विनायकराव संभाषणाचे देता येईल. 'गति सापेक्ष असते' किंवा 'गतिमान पदार्थाचा मार्ग भिन्न निरीक्षकांना (पुस्तकात 'निरीक्षक' हा साधा शब्द न वापरता 'द्रष्टा' हा भिन्न अर्थाने वापरला जाणारा शब्द वापरला आहे) भिन्न दिसतो. ही गोष्ट स्पष्ट करण्यासाठी हे संभाषण घातले आहे. पण ती कल्पना सामान्य वाचकाला या संवादाने स्पष्ट होते असे म्हणवत नाही. मुख्यतः प्रभाकरपंतांचे शेवटचे भाषण जरा डोक्यावरूनच जाते. पुस्तकाच्या संथ गतीत हे भाषण फारच झपाट्याने आले आहे. त्या मानाने जॉन लॉक या तत्त्वज्ञाने दिलेले व या संदर्भात नेहमी उल्लेखिले जाणारे (अुदा० लिंकन बार्नेट, 'युनिव्हर्स ॲण्ड डॉ. आअिन्स्टीन,') बुद्धिबळाच्या पटाचे उदाहरण फारच छान आहे. तो म्हणतो, "बुद्धिबळाची मोहरी आहेत त्याच घरात ठेवून पट एका खोलीतून दुसऱ्या खोलीत नेला तरी आपण म्हणतो, 'मोहरी जागच्या जागीच आहेत', खोलीच्या ज्या भागात पट आहे तिथेच तो ठेवून ही खोली जरी एकाद्या बोटीवरची असेल व ती बोट किनाऱ्यापासून दूर जात असेल तरी आपण म्हणू, 'पट जागच्या जागीच आहे...' आणि किनाऱ्या--

* लेखक—श्री. वा. ज. खेर. प्रकाशक : समाज प्रबोधन संस्था, पृष्ठे : १४+४४३ ; मूल्य ८ रु.








पासून अतर न बदलणारी बोट आपल्याला 'स्थिर' वाटते, पण तोपर्यंत पृथ्वी स्वतःभोवती आणि सूर्याभोवती कित्येक मैल फिरलेली असते. ..! "

यानंतरच्या तीन प्रकरणात श्री. खेर यांनी मूळ प्रश्नाची पार्श्वभूमी निर्माण केली आहे. 'न्यूटनचे गतिशास्त्र' हे प्रकरण फारच सुरेख झाले आहे. मात्र 'गति' आणि 'गतिबदलाचा दर' यातील फरक नीटपणे स्पष्ट झाल्यासारखा वाटत नाही. वास्तविक या कल्पना कळणे फार आवश्यक आहे. गतीची कल्पना आपणास असते पण गतिबद्दलच्या दराची नीटशी कल्पना आपल्याला–निदान जो वाचकवर्ग श्री. खेर यांनी डोळ्यासमोर ठेवला आहे त्याला– नसते असेच म्हणावे लागेल वास्तविक मॅट्रिकच्या अभ्यासक्रमात न्यूटनच्या गतिविषयक नियमांचा अंतर्भाव केलेला आहे. त्या संदर्भात 'गति किंवा 'वेग' व 'गतिबदलाचा दर' म्हणजे 'प्रवेग' किंवा 'त्वरण' यांच्या व्याख्या विद्यार्थी पाठ करतात. पण या ना त्या कारणाने या भागाकडे विद्यार्थी– आणि शिक्षकही दुर्लक्ष करतात असे दिसून येते. या पुस्तकात त्यांची स्पष्ट कल्पना मांडली जाणे आवश्यक होते असे वाटते. कारण ॲरिस्टॉटलची ' गतिमान पदार्थावर सतत प्रेरणा कार्य करीत असते' ही कल्पना खोडून 'प्रवेग किंवा त्वरण असणाऱ्या पदार्थावरच प्रेरणा सातत्याने कार्य करते' ही कल्पना गॅलिलिओने मांडली. त्यामुळेच त्याला आधुनिक विज्ञानाचा जनक म्हटले जाते. हीच कल्पना न्यूटनच्या गतिविषयक पहिल्या दोन नियमात सूत्रबद्ध केलेली आहे. 'न्यूटनचे गतिशास्त्र' या प्रकरणानंतर 'आशा' व 'निराशा' ही प्रकरणे एक प्रकारे सापेक्षतावादापुढील प्रश्न कोणता हे दाखविणारी आहेत. एकाद्या पदार्थाची 'निरपेक्ष' गति कळण्यासाठी शुद्ध किंवा निरपेक्षपणे स्थिर काहीतरी असले पाहिजे. तसे ते आहे असा न्यूटनचा विश्वास होता. न्यूटन-गॅलिलिओ-प्रणीत शिष्टमान्य विज्ञानाची उभारणी याच विश्वासावर झालेली आहे. मात्र आश्चर्य असे की अशी 'निरपेक्ष गती' काढता येणे अशक्य आहे–निदान पृथ्वीवरील कोणत्याही प्रयोगाने अशक्य आहे ही कल्पना न्यूटनला होती. न्यूटन स्वतः अतिशय धार्मिक होता; हे जे काही 'निरपेक्ष स्थिर' तेच परमेश्वर-स्वरूप असे तो म्हणत असे. अितकेच नव्हे तर ते शोधून काढण्याचा वैज्ञानिक प्रयत्न करणेच चूक आहे असे तो मानी!

अशा रीतीने 'निरपेक्ष स्थिर' व्यूह शोधून काढण्याच्या प्रयत्नात शिष्टमान्य गतिविज्ञानाने–यंत्रशास्त्र किंवा मेकॅनिक्स्‌पेक्षा हा शब्द अधिक सार्थ वाटतो– हात टेकले खरे; पण त्याच वेळी फॅरडे-मॅक्स्वेल्‌प्रणीत विद्युत्‌चुंबकशास्त्राचा जन्म झाला. खरोखर न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणाच्या नियमाच्या तोडीचीच म्हणावी अशी फॅरडेची विद्युत्-चुम्बकीय क्षेत्राची कल्पना आहे. 'प्रकाश', 'मायकेल्सन-मोर्ले प्रयोग ' व 'नवे कोडे' या तीन प्रकरणात लेखकाने मॅक्स्वेल-फॅरडे यांच्या शिष्टमान्य विद्युत्-चुंबकशास्त्राची वाढ कशी झाली याचा इतिहास सांगितला आहे. यापैकी 'प्रकाश' या नवव्या प्रकरणाच्या शेवटी 'गतिविज्ञानाने नाही तरी विद्युत्-चुंबकशास्त्राने, विशेषतः प्रकाशाच्या साहाय्याने 'निरपेक्ष' किंवा 'खरा स्थिर' जडव्यूह शोधून काढता येईल ही शास्त्रज्ञांना वाटलेली आशा दर्शविली आहे. याच प्रकरणात प्रकाशाची गती व त्याचे स्वरूप यांविषयी सविस्तर चर्चा आहे. तसेच प्रकाशाच्या स्वरूपाविषयी न्यूटनचा कण-सिद्धांत व हायगेन्सचा तरंग-सिद्धांत देऊन तरंग-सिद्धांत सुप्रतिष्ठित होण्याची कारणे दिली आहेत. प्रकाशाचे विवर्तन ( diffraction ) व 'व्यत्यय' (interference) यांची माहिती देऊन या गोष्टी स्पष्ट होण्यासाठी प्रकाश तरंगमय असणे आवश्यक असल्याचे 'सिद्ध' केले आहे. प्रकाश तरंगमय आहे हे सिद्ध होण्यास आणखीही एका गोष्टीची मदत झाली. 'ध्रुवीकरण' ( polarization ) हे तरंगांनीच शक्य होते. श्री. खेर यांनी ध्रुवीकरणाचा उल्लेख केलेला नाही. अर्थात् पुस्तकाचा आकार आहे तेवढा तरी राखण्यासाठी तसे करणे भाग होते. वस्तुतः विवर्तन व व्यत्यय यांचे तरी इतके विस्तत बिवेचन आवश्यक होते काय हा प्रश्नच आहे. विवर्तन म्हणजे काय हे दाखविण्यासाठी पृष्ठ ९८ वर एक आकृती दाखविली आहे. उभ्या व आडव्या फटीतून जाणाऱ्या दोरीला उभी कंपने दिल्यास नंतर तिची कंपने कशी नष्ट होतात हे या आकृतीवरून समजते. पण हे विवर्तन नसून ध्रुवीकरण आहे. म्हणजे ध्रुवीकरणाच्या आकृतीने विवर्तनाचे स्पष्टीकरण असा जरासा विचित्र








प्रकार झाला आहे. वेगवेगळ्या लहरींवर असलेल्या बिंदूंची हालचाल निरनिराळ्या स्थितीमुळे कमी-अधिक होणे म्हणजेच विवर्तन. असो. प्रकाश हा तरंगमय आहे. हे एकदा ठरल्यानंतर स्वाभाविकच प्रश्न निर्माण होतो, 'हे तरंग कशातले ?' पाण्यात लाटा निर्माण होतात, ध्वनिलहरी हवेत (किंवा इतर कोणत्यातरी माध्यमात) असतात. मग प्रकाश-लहरी कशात आहेत असे म्हणावयाचे ? 'ईथर' ही कल्पना या प्रश्नाचे उत्तर म्हणून आलेली आहे.

पदार्थविज्ञानशास्त्रात 'ईथर' आले ते काही अडचणींचे निवारण करण्यासाठी. पण येताना त्याने स्वतः-च्या काही अडचणी आणल्या. लोणी वाटण्याची अडचण दूर करण्यासाठी माकडांनी मांजराला बोलाविले, पण तीच मोठी अडचण होऊन बसली. त्यातलाच हा प्रकार आहे. 'ईथर' च्या अस्तित्वाचा कोणताही प्रत्यक्ष पुरावा नव्हता ही एक अडचण होतीच. पण हजारो वर्षे अविरतपणे फिरणाऱ्या ग्रहगोलादिकांना ईथरमुळे काही विरोध होतो किंवा कसे ? तसा होत असावा असे वाटत नाही कारण नाहीतर या आकाशस्थ गोलांची—पृथ्वीसह— गती केव्हाच संपून गेली असती. मग प्रत्येक गोल फिरत असता स्वतःपुढील ईथर ढकलत नेतो की काय ? का हे गोल जात असता ईथरच त्यातून निघून जाते ? म्हणजे पाण्यातून चाळणी फिरवली असता त्यातून पाणी निघून जाते तसा काही प्रकार आहे की काय ? या गोष्टीचा एकदा सोक्षमोक्ष लावण्यासाठी मायकेल्सन व मोर्ले यांनी आपला विख्यात् प्रयोग केला. पण ईथर-कल्पना पडताळून पहाणे हा त्यांचा मुख्य उद्देश नव्हता. गॅलिलिओ-न्यूटन पासून जो एक खरा जडव्यूह शोधून काढण्याचा हव्यास शास्त्रज्ञांना लागला होता त्याची पूर्ती करणे व अशा तऱ्हेने पृथ्वीची 'निरपेक्ष' गती ठरविणे हाच त्यांचा प्रमुख उद्देश होता. म्हणूनच जगातल्या सर्व शास्त्रज्ञांचे या प्रयोगाकडे लक्ष लागलेले होते. पण.. पण या प्रयोगातून काहीच निष्पन्न झाले नाही... आणि विज्ञानजगताला भयंकर धक्का बसला. 'पृथ्वीच्या किंवा कसल्याच गतीचा प्रकाशावर काहीच परिणाम होत नाही" हाच मायकेल्सन-मोर्ले प्रयोगाचा निष्कर्ष. या प्रयोगाने शास्त्रज्ञांपुढे दोनच पर्याय ठेवले. एक म्हणजे पृथ्वी व इतर ग्रहगोलादी स्थिर असले पाहिजेत. किंवा ईथर हा कल्पित पदार्थ नसलाच पाहिजे. खरोखर ईथर ही कल्पना इतकी यशस्वी व म्हणून सुप्रतिष्ठित झाली होती की तिचा त्याग करण्यापेक्षा पृथ्वी स्थिर मानणेच बरे असे कित्येक शास्त्रज्ञांना वाटले.

थोडक्यात असे म्हणता येईल की मायकेल्सन-मोर्ले प्रयोगाने उभे केलेले दोन्ही पर्याय इतके भयानक होते की त्यांना तोंड देण्याची दृष्टी व साहस त्या वेळच्या विज्ञान-जगतात नव्हते. या दोन्ही गोष्टींवर विज्ञानाने सारखाच विश्वास ठेवला होता. या दोन्हीतील विसंगती दूर करण्याची धडपड अनेकांनी केली. त्यातच लॉरेंझची संकोचकल्पना येते. स्थलसंकोचाचे शास्त्रज्ञांना फारसे विशेष वाटले नसते, पण 'काल-विस्तार' ही अतिभयंकर कल्पना त्यातून डोकावली. आणि ती आकळणे तिच्या पित्याला— लॉरेंझलाही— शक्य झाले नाही. येथपर्यंत श्री. खेर यांनी आईन्स्टी-नच्या उदयाची पार्श्वभूमी निर्माण केली आहे.

क्रांतीची पूर्वतयारी झालीच होती. आइन्स्टीनने निर्भयपणे ठासून सांगितले की, "स्थिर ईथर किंवा ईथरसापेक्ष अशी गति नाहीच. सर्व गती या सापेक्षच आहेत. निरपेक्ष गतीला काहीच अर्थ नाही." या एकाच धोंड्याने आइन्स्टीनने कितीतरी पक्षी मारले. मायकेल्सन-मोर्ले प्रयोगाने निर्माण केलेले कोडे तर त्याने सोडविलेच पण 'पृथ्वी स्थिर की गतिमान ?' 'विश्वाच्या केन्द्रस्थानी पृथ्वी की सूर्य ?' अशा अनेक प्रश्नातील हवा त्याने काढून घेतली. मात्र वरवर अगदी साधे दिसणारे वरील विधान भयंकर गोष्टींना जन्म देणारे ठरले. या गोष्टींचा विचार म्हणजेच 'सापेक्षतावाद'. एका दृष्टीने 'आइन्स्टीनचे नवे विश्व' इथून सुरू होते. लॉरेंझने हुडकून काढलेली रूपान्तरसूत्रे हीच या नव्या म्हणजे खऱ्या विश्वातील विनिमयसूत्रे होत. त्यामुळे अर्थातच 'स्थल-संकोच' किंवा कालविस्तार' या गोष्टी अगदी स्वाभाविक म्हणजे 'बे दुणे चार, बे त्रिक सहा' सारख्या आहेत. शिवाय त्यांना प्रत्यक्ष प्रयोगांचा पुरावा असल्याने त्या खऱ्या मानणे भागच आहे. त्या आपणाला अस्वाभाविक, कृत्रिम, अवघड वाटतात म्हणून चुकीच्या मानणे हे 'जिथे कोंबडे नाहीत तिथे सूर्य कसा उगवेल ?' अशी चिंता करण्यासारखे विचित्र आहे. पण आपल्या मनाची अशी अवस्था होते हे खरे. पण








त्याचे कारण आइन्स्टीनचा सिद्धांत अवघड आहे हे नसून आपल्याला कोंबडा आरवल्यानंतर सूर्य उगवलेला पहाण्याची सवय झाली आहे हेच आहे. सापेक्षतावादानुसार निघणाऱ्या सर्वच गोष्टींचे विवेचन लेखकाने तेराव्या प्रकरणापासून एकविसाव्या प्रकरणापर्यंत केलेले आहे. पैकी एकविसावे 'पदार्थावर संक्रांत' हे प्रकरण अधिक महत्त्वाचे आहे. कारण केवळ सैद्धान्तिक विचारांतून प्रत्यक्ष मानवी जीवनावर प्रभाव पाडणारे काहीतरी निर्माण झाल्याचे येथे दाखविले आहे. ते म्हणजेच अण्वस्त्रांची शक्यता! वस्तुमान ही एक प्रकारची शक्तीच आहे व ती काही प्रयत्नांनी मुक्त करता येईल हा सापेक्षतावादाचा अत्यंत क्रांतिकारक विचार यात सांगितलेला आहे. अणुविच्छेदनाने किंवा अणुसंयोगानेही काही वस्तुमान नष्ट करून त्याचे रूपांतर शक्तीत होते– होईल– हे आइन्स्टीनने १९०५मध्ये प्रथम मांडले. मात्र ते प्रत्यक्षात उतरायला १९४५ साल उजाडावे लागले.

'स्थलकाल' या काहीशा लांबलेल्या प्रकरणात लेखकाने आइन्स्टीनच्या तत्त्वांमुळे पदार्थविज्ञान-शास्त्राच्या दृष्टीकोनात कसा बदल झाला ते दर्शविले आहे. 'चतुर्मित विश्व' म्हटले की सामान्य वाचकाला नवकविता वाचल्यासारखे किंवा नवचित्र पाहिल्यासारखे वाटते. वास्तविक आलेख काढताना 'अंतर-वेळ' हा आलेख आपण विद्यार्थी-जीवनात कितीतरी वेळा पाहिलेला-काढलेला असतो. तसेच रेल्वे दरवर्षी दोनदा वेळापत्रक प्रसिद्ध करते– आणि त्याची अंमलबजावणी रोज वेगवेगळ्या प्रकारे करते. वास्तविक रेल्वेचे वेळापत्रक म्हणजे 'वेळ-अंतर' दाखविणारा आलेखच! आइन्स्टीनचे चतुर्मित-विश्व म्हणजे 'लांबी-रुंदी-जाडी-वेळ' असलेले वेळापत्रकच. विश्वातील कोणतीही घटना सांगताना ती कोठे झाली व केव्हा झाली हे सांगितलेच पाहिजे. हे शिष्टमान्य विज्ञान व आपली सारासार बुद्धी मान्य करतेच. 'कोठे?' हे दर्शविण्यासाठी तीन अंतरे (निर्देशांक) सांगावी लागतात व काल सांगण्यासाठी एक अंक असे चार आकडे (अंकसंच) माहीत असले की घटना निश्चित होते. आइन्स्टीनच्या तत्त्वामुळे जर यात काही बदल झाला असेल तर तो इतकाच की स्थल आणि काल हे पूर्वी जे अगदी भिन्न समजले जात, ते काही मर्यादित घटनांपुरते तरी, तसे नाहीत असे ठरले. चतुर्मित विश्वाची ही कल्पना मिंकोवस्की या रशियन गणितज्ञाने प्रथम मांडली. अशा रीतीने पहिल्या चोवीस प्रकरणात श्री. खेर यांनी आइन्स्टिनच्या 'विशिष्ट सापेक्षतेचा' परिचय घडविला आहे.

पंचविसाव्या 'नवी उत्तरे, नवे प्रश्न' या प्रकरणा-पासून 'नव भूमिती' या अठ्ठाविसाव्या प्रकरणापर्यंत लेखकाने 'व्यापक-सापेक्षते'ची पार्श्वभूमी मांडली आहे. व्यापक सापेक्षता म्हणजे एक प्रकारे आइन्स्टीनच्या गुरुत्वाकर्षणाच्या नियमाचे विवेचन होय. न्यूटनचा गुरुत्वाकर्षणाचा नियम काही सूक्ष्म बाबीत तितकासा अचूक ठरला नाही. (उदा. बुधाची कक्षा) ही त्यातली उणीव होतीच. पण त्याहीपेक्षा त्याचे कृत्रिमपण जास्त बोचणारे होते. "मध्ये काहीही नसताना लक्षावधी मैलांवरून एक गोल दुसऱ्या गोलावर आकर्षण कार्य करतो, म्हणजे काय?" हा प्रश्न स्वतः न्यूटनलाही पडला होताच. शिवाय त्याच्या नियमात पदार्थाचा आलस्यमह आणि गुरुत्वमह (–लेखकाचे शब्द) हे सारखे असूनही त्याचे स्पष्टीकरण काहीच करता येत नाही. श्री. खेर यांनी गुरुत्वमह व आलस्यमह यांचे स्वरूप चांगले स्पष्ट केले आहे. अर्थात हे प्रत्यक्षात एकच असल्याने त्यातील फरक स्पष्ट करून "तसा तो का नाही?" याचा हा विचार आहे. त्यामुळे हा भाग एकंदरीत अवघडच म्हटला पाहिजे. ही कल्पना स्पष्ट करण्यासाठी पुढील दोन उदाहरणांचा उपयोग केला जातो. लेखकाने त्यांचाही उपयोग केला असता तर बरे झाले असते. दोन विद्युत् भारांमधील प्रेरणा त्यांच्यावरील भारांवर अवलंबून असते, पण त्यापैकी एक भारित पदार्थ स्थिर ठेवून दुसरा मोकळा ठेवला तर त्यावर जे त्वरण कार्य करील ते मात्र त्या पदार्थाच्या वस्तु-मानावरच अवलंबेल. तीच गोष्ट चुंबकीय ध्रुवांची आहे. त्यातील प्रेरणा त्यांच्या ध्रुवशक्तींवर अवलंबते पण त्वरण मात्र वस्तुमानावर अवलंबून रहाते! गुरुत्वाकर्षणाचे बाबतीत मात्र प्रेरणा व त्वरण दोन्ही वस्तुमानावरच अवलंबून असतात. हेच दुसऱ्या भाषेत सांगावयाचे तर 'गुरुत्वमह व आलस्यमह सारखेच असतात.' हे का? न्यूटनप्रणीत विज्ञान म्हणते, "हा








एक योगायोग आहे ! " एकाद्या चित्रपटात किंवा डिटेक्टिव्ह कथेतसुद्धा योगायोगाचा फार उपयोग केलेला असेल तर तो चिकित्सक वाचकाला रुचत नाही. मग विज्ञानात योगायोगाला स्थान देणे कितपत योग्य ठरेल ? म्हणूनच रसेल म्हणतो, " न्यूटनचा गुरुत्वाकर्षणाचा नियम तर्कसंगत नाही. तो अगदी अचूक असता व आइन्स्टीनचा नियम चुकीचा ठरता तरी विज्ञान न्यूटनच्या नियमाकडे वळले नसते, त्याने तिसराच नियम पाहिला असता. केवळ तर्कशुद्ध नाही या एकाच गोष्टीमुळेसुद्धा न्यूटनचा नियम त्याज्य ठरतो ! "

'व्यापक-सापेक्षता' आणि 'आइन्स्टीनचा गुरुत्वाकर्षणाचा नियम' सांगून झाल्यानंतर लेखकाने 'सापेक्षतेचा जयजयकार' या प्रकरणात व्यापक सापेक्षता कोठे कोठे पडताळून पहाण्यात आली आहे हे दिले आहे. तसेच तत्पूर्वी कधीही कल्पनेतही नसलेल्या कोणत्या गोष्टींची (उदा. प्रकाशकिरणांचे गुरुत्वाकर्षणामुळे होणारे विचलन) भाकिते केली व ती कशी खरी ठरली हेही दिलेले आहे. माझ्या मते हे प्रकरण व मर्यादित सापेक्षतेनंतरचे 'कल्पनाविलास की सत्य ?' हे प्रकरण, ही दोन्ही फारच महत्त्वाची आहेत. पुस्तक वाचीत असता ही दोन प्रकरणे मधून-मधून चाळीत असावे म्हणजे वाचकाला मध्येच 'खरेच हे असे असेल ?' असा प्रश्न पडणार नाही. किंबहुना या प्रकरणातील काही गोष्टींचा तरी प्रस्तावनेतही आवर्जून उल्लेख करावयास हवा होता असे वाटते. त्यानंतरचे 'शंका-समाधान' हे प्रकरण आवश्यकच होते. नेमके प्रश्न विचारून त्यांची उत्तरे दिल्याने वाचकांचे अंशतः तरी समाधान होतेच. त्यानंतर 'विश्वविचार' हे तात्त्विक प्रकरण व दोन परिशिष्टे देऊन पुस्तक संपविले आहे.

पुस्तकात काही गोष्टींचा विस्तार जास्त झाला आहे असे मागे म्हटलेच आहे. तो कमी केला असता– आणि सौंदर्य व विषयविवेचनाचे सामर्थ्य न गमावता तसे करता आले असते– तर पुस्तक अधिक सुटसुटीत झाले असते. पुस्तकातील गणिताबद्दलही असेच म्हणता येईल. लेखकाने प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे गणिताचा भाग टाळूनही पुस्तक वाचता येईल हे खरे, पण सामान्य वाचक तसे करीत नाही. तो पुस्तकात गणितमयता आहे हे पाहताच पुस्तक वाचण्याच्या 'भानगडीत' पडतच नाही. हा कदाचित् त्याचा दोष असेल पण त्याला दोष देऊन काहीच साधणार नाही. खरोखर गणितांतल्या चार ओळी व्यवस्थित समजून वाचायला जितकी एकाग्रता लागते तेवढ्यात इतर मजकूर पानभर वाचून होईल. या बाबतीत ॲडिंग्टनने केले आहे तो मार्ग आदर्श ठरावा. त्याने सामान्य वाचकांसाठी 'स्पेस, टाईम, ग्रॅव्हिटेशन' हे पुस्तक लिहिले व या विषयाच्या विद्यार्थ्यांसाठी 'मॅथेमॅटिकल थिअरी ऑफ रिलेटिव्हिटी' हे वेगळे पुस्तक लिहिले. रसेल, कोल्मन, लिंकन बार्नेट यांनी लिहिलेल्या पुस्तकांत गणित व सूत्रादिकांचा नाममात्र उल्लेख आहे. आणि जॉर्ज गॅमावचे 'टॉमकिन्स् अिन् वंडरलॅण्ड' हे तर रिलेटिव्हिटीवरील विनोदी पुस्तकच म्हणावे लागेल ! आपल्याकडील विद्यापीठातून –निदान पुणे विद्यापीठात तरी– गणित घेणाऱ्या विद्यार्थ्यांना 'सापेक्षता' हा विषय ऐच्छिक म्हणून घेता येतो. या विषयाला आजकाल किती विद्यार्थी असतात हे मला माहीत नाही. पण प्रथम तरी त्याला मिळालेला प्रतिसाद बेताचाच होता. मला वाटते की महाविद्यालयातील विद्यार्थी जर हे पुस्तक वाचतील तर त्यांना विद्यापीठात सापेक्षता विषय घेण्याचा मोह नक्कीच होईल. आताच हा विषय घेतलेल्या विद्यार्थ्यांनी व तो शिकविणाऱ्या शिक्षकांनी तर हे पुस्तक कायम संग्रही ठेवावे असेच आहे.

विषयाचे मराठीकरण फारच सुंदर झाले आहे. बहुतेक प्रतिशब्द चपखल आणि सार्थ आहेत. तरंगायाम, संकोचकल्पित, नीलातीत,व्यत्यय हे शब्द इतके सुंदर आहेत की मूळ मराठीतीलच वाटावेत; त्यांच्या अर्थासाठी पुढे कंसात दिलेले इंग्रजी शब्द पहाण्याची मुळीच आवश्यकता वाटत नाही. 'वस्तुमान' या रूढ शब्दाऐवजी मह हा शब्द वापरण्याची आवश्यकता होतीच असे नाही. तसेच 'निरीक्षक' हा सोपा सुटसुटीत शब्द सोडून 'द्रष्टा' हा भिन्न अर्थाने वापरला जाणारा शब्द का वापरला आहे हे कळत नाही. अर्थात् असे एखादंदुसरे उदाहरण वगळल्यास 'मराठीकरण' अत्यंत यशस्वी झाले आहे








असे सहज म्हणता येईल. लेखकाची व्युत्पत्ति-दृष्टी आणि संस्कृत भाषेचा सखोल अभ्यास त्यावरून मनावर ठसल्याशिवाय राहात नाही.

वरील एकदोन किरकोळ गोष्टींनी पुस्तकांच्या मौलिकतेवर मुळीच परिणाम झालेला नाही. पुस्तक वाचल्यानंतर खरोखर एका दिव्य अनुभवाचा लाभ होतो यात शंका नाही. जग आपलेच, पण तेही एका विशिष्ट दृष्टीकोनातून पाहिल्याने अभूतपूर्व वाटते. या दृष्टीने श्री. खेर पूर्णपणे यशस्वी झाले आहेत. आपल्या अद्वितीय प्रतिभेने सापेक्षतेसारखी विचारसरणी मांडणारा आइन्स्टीन तर थोरच, पण त्याच्या गूढ सिद्धांतांचा आमच्यासारख्या सामान्य वाचकांना परिचय करून देणारे रसेल, अेडिंग्टन किंवा खेर यांचेही कार्य अतिशय महत्त्वाचे आहे. श्री. खेर यांचा अशा विषयांचा प्रदीर्घ व्यासंग पाहून त्यांजकडून आणखी काही अपेक्षा केल्यास गैरवाजवी दिसणार नाही. सापेक्षतावादाप्रमाणेच 'शक्तिचय सिद्धान्त (Quantum theory) हाही आधुनिक विज्ञानाचा दुसरा आधारस्तंभ मानला जातो. तसेच सनातन विज्ञानातील अजूनही शाबूत राहिलेला 'उष्णजगतिशास्त्र' (Thermodynamics) हा विषयही मराठीला नवीनच आहे. श्री. खेर यांनी व समाज प्रबोधन संस्थेने हे काम हाती घ्यावे अशी त्यांना सादर विनंती करून व तशी आशा करीतच मी हे रसग्रहण पुरे करतो.

— भा. रा. बापट

---

# सार-संकलन

## युरोप व भविष्यकाळ

पृथ्वी गोल आहे ही सर्वात आनंदाची गोष्ट आहे. त्यामुळे पृथ्वीवरील प्रत्येक राष्ट्राला जग आपल्या भोवती फिरत आहे असे वाटते. व तदनुसार ते आपला जगाचा नकाशा तयार करतात. परंतु प्रत्येक कालखंडात जगाच्या अशा अनेक नकाशांपैकी एकच नकाशा सत्य असतो. १९ व्या शतकातील युरोप, पृथ्वीचा मध्यबिंदू होता, हे दर्शविणारा नकाशा अजूनही युरोपिअन समाजाच्या डोक्यात आहे. आजच्या जगाचा उत्तर ध्रुवावरील प्रदेशाचा अवकाशयानातून घेतलेला नकाशाच सत्य आहे, पण युरोपला तो परिचित नाही.

या नकाशावरून अनेक गोष्टी लक्षात येतात. या नकाशाचा, जगातील दोन तृतीयांश कामगारांना औद्योगिक क्रांतीची फळे मिळाल्याखेरीज जगाला स्थैर्य येणार नाही या गोष्टीशी काडीमात्र संबंध नाही. हा नकाशा युरोपिअन समाजास मात्र धडे शिकविण्यास समर्थ आहे. या नकाशात आर्टिक महासागर प्रामुख्याने दिसत असून रशिया व अमेरिका यांच्या एकमेकाशी भिडलेल्या सीमा स्पष्ट दिसत आहेत. किंबहुना जगातील अतिबलाढ्य राष्ट्रे एकमेकांच्या किती जवळ आहेत हे हा नकाशा दर्शवितो. दुसरी गोष्ट म्हणजे या राष्ट्रांच्या बगलेस असलेला युरोप दुसऱ्या बगलेस असलेल्या चीनपेक्षा जराही मोठा नाही ही गोष्टही स्पष्ट होते. तिसरी गोष्ट म्हणजे सर्व मागस राष्ट्रे या नकाशाच्या बाह्य सीमेवर पसरली आहेत.

या नकाशातील युरोप हा आधुनिक जागतिक संस्कृतीच्या संदर्भात बुटुकुला असून या नव्या परिस्थितिनुसार वागण्यास त्याने शिकले पाहिजे. एक वेळ जगाचे नेतृत्व युरोपने केले पण आता ती गोष्ट विसरली पाहिजे. दुसरी गोष्ट म्हणजे आशिया खंडाला चिकटलेली युरोपची भूमी जगातील व्यापारीवर्गाची भूमी आहे. त्यामुळे अमेरिका, रशिया किंवा चीन या सर्वांपेक्षा जगाच्या समृद्धीतच युरोपचा फायदा आहे; व म्हणूनच युरोपच्या आर्थिक धोरणावरच त्याचा जागतिक राजकारणातील प्रभाव सर्वस्वी अवलंबून राहील. म्हणूनच युरोपची शकले उडू न देता ब्रिटनसह सर्व युरोपिअन राष्ट्रांनी एकत्र येऊन प्रभावी आर्थिक धोरण आखून आपला मार्ग सुकर केला पाहिजे. हा प्रयत्न अजून जाणीवपूर्वक होत नसला तरी प्रत्यक्ष कृती व मार्ग एकमेकाजवळ येत आहेत हे मात्र नक्की.

## सामूहिक जग

१८ मार्च रोजी ब्रिटिश पंतप्रधान विल्सन यांनी 'ब्रिटनच्या परराष्ट्रीय व संरक्षण धोरणावर कोठल्याही सुप्रानॅशनल सत्तेचे वर्चस्व आम्ही चालू देणार नाही', असे घोषित केले. युरोपातील सहा बड्या राष्ट्रांचे राजकीय संबंध आज छत्तिसाच्या आकड्यासारखे आहेत. परंतु आर्थिक बाबतीत एक धोरण आखणे त्यांना शक्य झाले आहे. ब्रिटनच्या दृष्टीने युरोपिअन राष्ट्रांशी मिळतेजुळते घेऊन संगनमत करणे म्हणजे जागतिक राजकारणातसुद्धा आपले वर्चस्व वाढवणे, असे आहे. परंतु युरोपिअन राष्ट्रे संकुचित दृष्टिकोनातून स्वतःपुरते पहाणारी आहेत, किंवा युरोप शीतयुद्धाचे क्षेत्र आहे यापेक्षाही युरोपातील राष्ट्रे लोकशाही नाहीत याची ब्रिटनला जास्त भीती वाटते. धर्मगुरूंच्या वर्चस्वाखाली असलेला युरोप आजही लिबरल प्रॉटेस्टंट मूल्यांना धुळीस मिळवेल अशी त्यांना भीती वाटत आहे. युरोपने स्वीकारलेला सुधारकी समाजवाद नाममात्र आहे असे त्यांना वाटते.

जनरल द गॉल सत्तारूढ असेपर्यंत युरोपातील सहा राष्ट्रांचे परराष्ट्रीय धोरण एक होईल याची शक्यता नाही. आणि ही परिस्थिती जितके जास्त दिवस टिकून राहील तितकी ती कायम रहाण्याची शक्यता पण वाढेल. फ्रान्स व ब्रिटन आपल्या अण्वस्त्रांच्या जोरावर पश्चिम युरोपातील सामर्थ्यशील राष्ट्रे म्हणून वावरण्याचा प्रयत्न करीत आहेत. पूर्व व पश्चिम जर्मनी एकत्र येऊन एक बलाढ्य राष्ट्र निर्माण करण्याचा प्रयत्न करीत आहेत. व या तणातणीच्या वातावरणात युरोपच्या एकतेची सुप्त बीजे नाश पावण्याची शक्यता निर्माण झालेली आहे.

दुसरे बाजूस युरोपिअन राष्ट्रांची राजकीय एकता वाढीस लागावी ही मतप्रणालीपण प्रबल होत आहे. युरोपिअन कॉमन मार्केटमुळे ही मागणी जास्तच प्रभावी होत आहे. द गॉलसुद्धा ही मागणी मारू शकणार नाही. युरोपिअन राष्ट्रांच्या समूहात








आपल्याला समान पातळीवर वागवण्यात यावे व त्या समाजाशी एकरूप होऊन स्थैर्य प्राप्त करून घ्यावे व अशी इच्छा जर्मनीत सहाजिकच तीव्र होत आहे. जागतिक घडामोडींचे संदर्भात युरोपने जास्त प्रभावी होण्याची पण आवश्यकता वाटू लागली आहे. संयुक्त राष्ट्रसंघातील युरोपिअन राष्ट्रांचे कमकुवत धोरण त्यांच्या गतकालास शोभेसे नाही. आपसातील यादवीमुळे जास्तच दुर्बल होणे युरोपला यापुढे परवडणार नाही.

चीनने लागोपाठ केलेल्या अणुबॉम्बच्या स्फोटा-मुळेही युरोपिअनराष्ट्रांचे ऐक्य अपरिहार्य झाले आहे. अमेरिका किंवा दक्षिण आस्ट्रेलियापेक्षा चीनच्या अण्वस्त्रक्षेपणाच्या कक्षेत युरोप जवळचा आहे. रशियापेक्षा चीन जास्त धोकेबाज आहे हे लक्षात ठेवून युरोपिअन राष्ट्रांनी चीनशी राजनैतिक संबंध प्रस्थापित करण्याचे ठरवले तरी सुद्धा अण्वस्त्रांनी सज्ज व संघटित झालेल्या युरोपचा चीनला दरारा वाटल्याखेरीज राहणार नाही. म्हणूनच युरोपचे राजकीय ऐक्य व्हावे ही भावना सत्यस्वरूप व्हावी असे वाटणे वावगे नाही.

## अंतर्मुख की बहिर्मुख ?

वैचारिक पातळीवरच ब्रिटन युरोपिअन संघ-राज्यात सामील होऊ शकेल. अंतर्मुख झालेले ब्रिटन आत्मनिरीक्षण करून या संघराज्यात येईल. ब्रिटन-पुढे दोन महत्त्वाच्या समस्या आहेत. एकतर युरोपिअन ऐक्याचा प्रश्न व दुसरा म्हणजे मागस राष्ट्रांना मदत, जागतिक खुला व्यापार व पूर्व पश्चिम यातील शांतता यासारख्या महत्त्वाच्या प्रश्नांचे आव्हान. १९६२ साली गॅटस्केलने या गोष्टीकडे ब्रिटीश नेत्यांचे लक्ष वेधण्याचा प्रयत्न केला होता. आज ब्रिटनजवळ मागस राष्ट्रांना मदत देण्याइतके फार काय सुएझच्या पूर्वेकडील प्रदेशात प्रभावी धोरण आखण्याइतकेसुद्धा भांडवल नाही ही गोष्ट उघड आहे.

मागस राष्ट्रातील कारखानदारांना युरोपातील सहा राष्ट्रे योग्य तऱ्हेचा सल्ला किंवा मदत देत नाहीत या ब्रिटनच्या म्हणण्यात तथ्य असले तरी त्याला सोवळेपणाचा वास आहे. ब्रिटनचे राष्ट्रकुलातील राष्ट्रांशी असलेले व्यापारी संबंध दोषास्पद नसले तरी ' पौंडगंगाजळी " राष्ट्रात ब्रिटिश मालाला ख़ास सवलती मिळतात हे विसरून चालणार नाही. इतर युरोपिअन राष्ट्रांच्या धोरणावर नुसती टीका न करता ब्रिटनने सर्व युरोपिअन राष्ट्रांना एकत्र येण्यास मदत करून मागस राष्ट्रांना संघटित मदत करण्यास उद्युक्त करणे महत्त्वाचे आहे. युरोपिअन संघराज्यात सामील झालेले ब्रिटन त्याच्या विकास-धोरणावर स्वतःच्या ठसा उमटवू शकणार नाही असे म्हणणे म्हणजे ब्रिटनच्या शक्तींना कमी लेखणे किंवा युरोपातील सहा राष्ट्रे कोठल्याही प्रकारच्या Sti-muly डिवचण्याने जागृत होऊ शकत नाहीत असे म्हणणे होय.

युरोपिअन राष्ट्रसंघटनेत ब्रिटन, नॉर्वे डेन्मार्क व व आयर्लंड यांचा समावेश झाला म्हणजे त्या संघटनेत दर्यावर्दी व व्यापारी राष्ट्रांचा पगडा सहाजिकच वाढेल व व्यापारविषयक धोरणावर त्यांचा जास्त जास्त प्रभाव पडल्याखेरीज रहाणार नाही. युरोपिअन राष्ट्रसंघटणेकरवी, मागस राष्ट्रांना देण्यात आलेली मदत वाढवण्यास मदत करून त्याचा ओघ फ्रेंच आफ्रिकी राष्ट्राव्यतिरिक्त इतर गरजू राष्ट्रांकडे वळविण्याचा ब्रिटनने यशस्वी प्रयत्न केला तर त्यामुळे त्यांचेच वजन वाढण्यास मदत होणार आहे. युरोपचे व्यापारी धोरण एक झाल्यास पुढील मार्ग सुकर होईल याबद्दल शंका नाही. या बाबतीतील परस्परविरोधी दृष्टिकोणापेक्षा प्रत्येक राष्ट्रातील जाज्वल्य राष्ट्रीय-त्वाची भावनाच एकसंधी युरोपिअन समाज निर्माण होण्याच्या वाटेत येणार असे वाटते. यामुळेच संस्थात्मक प्रश्नांना महत्त्व येणार आहे. एक अर्थसंकल्प व कॉमन-मार्केटसाठी योजलेले परराष्ट्रीय व्यापाराचे एक धोरण, मताधिक्याने नक्की करण्याची तरतूद कदाचित् यातून मार्ग काढू शकेल. आपले परराष्ट्रीय धोरणा-संबंधीचे सार्वभौमत्व नाहीसे होईल. या सबबीवर ब्रिटन युरोपिअन संघराष्ट्रातून किती दिवस बाहेर रहाणार

## अमेरिका

ब्रिटनने मलेशियाला, दिलेले लष्करी मदतीचे आश्वासन जुन्या साम्राज्यवादी कालातील आहे. या एका जबाबदारीव्यतिरिक्त सुएझच्या पूर्वेकडे आता-तरी ब्रिटनची जबाबदारी शिल्लक नाही. व ती फार काळ टिकेल असेही दिसत नाही. युरोपिअन राष्ट्रांनी आजच आशियामध्ये लष्करी जबाबदारी घेण्याचे

कारणही नाही. आर्थिक जबाबदारी मात्र युरोप उचलू शकला तर त्यात पुष्कळच फायदा आहे. परंतु आशियात लष्करी हितसंबंध कायम ठेवण्याचे एकच कारण असू शकेल व ते म्हणजे युरोपच्या सामर्थ्याबद्दल अमेरिकेचा गैरसमज होऊन त्यांनी खुद्द युरोपमधील लक्ष काढून घेऊ नये.

सुएझच्या पूर्वेकडील राजकारणासंबंधी अमेरिकेचे धोरण दोन गोष्टींवर अवलंबून असेल. एकतर पॅसिफिकमध्ये युद्धाची वाढती भीती व दुसरी म्हणजे युरोपात युद्ध होण्याची शक्यता कमी होणे. या दोन गोष्टीवर त्यांचे युरोपमधील धोरणसुद्धा ठरले जाण्याची शक्यता आहे. चीनची अण्वस्त्रात झपाटयाने होणारी प्रगती हाही एक महत्त्वाचा घटक आहे. चिनी प्रक्षेपणास्त्रांचे भय युरोपला पुष्कळच आहे. पण या भीतीने घबराट होऊन युरोपने तटस्थतेचे धोरण स्वीकारले तर चीन म्हणजे पूर्वेकडील जंगलातील रक्तपिपासू सिंह होण्याची शक्यता निर्माण होईल. विसाव्या शतकातील जर्मन राष्ट्राची पूर्वेकडे पुनरावृत्ती होईल अशीही भीती आहे. परंतु चांग-काय-शेक व माओ यांच्या मृत्यूनंतर परिस्थिती बदलण्याची शक्यता पुष्कळ आहे. चीन व फोर्मासा यांचेतील वैमनस्य कायम राहील असे नाही. व व्हिएटनाममध्ये धडा मिळाल्यामुळे पुन्हा एकदा एकाद्या कोळ्याच्या जाळयात शिरण्याचा मोह अमेरिकेला होईल असे वाटत नाही. त्यामुळे चीनला आग्नेय आशियात पुन्हा मानाचे स्थान प्राप्त होईल असे वाटते.

सरतेशेवटी युरोप व अमेरिका यांचे परस्परसंबंध पॅसिफिक मधील घडामोडीपेक्षा युरोपच्या सामर्थ्यावरच अवलंबून राहतील. पश्चिम युरोप व रशिया यांचा समझोता झाल्यास अमेरिकेची भूमिका परिस्थिती बिघडवू न देण्याऱ्या, परंतु लांब रहाणाऱ्या विश्वस्तांची राहील. पश्चिम युरोपने रशियाशी समझोता केल्यानंतर जर तंत्रविद्येसंबंधी आपला बंदिस्त दृष्टिकोन बदलला नाही तर अॅटलांटिकच्या तीरावर भला मोठा तटसुद्धा निर्माण होईल.

परंतु युरोपला अमेरिकेच्या तंत्रविद्येची गरज आहे. त्यांना अमेरिकन भांडवलदारांशी चढाओढ नको आहे, त्यांचेपासून त्यांना संरक्षण पाहिजे आहे. परंतु काही मोठमोठ्या अमेरिकन कंपन्या आजही युरोपमध्ये येऊन बसल्या आहेत. अशा परिस्थितीत युरोपिअन भांडवलदारांनी राज्यसत्तेचा आश्रय घेतला तरी त्यांना अमेरिकेशी सहकार्य केल्याखेरीज दुसरा मार्ग नाही. याचा अर्थ विसाव्या शतकात अमेरिकेची वसाहत बनणे किंवा स्वतंत्र राहणे हा प्रश्न नसून अमेरिकेचे सहकार्य घेऊन एक प्रकारची असोसिएशन प्रस्थापित करणे असा आहे. जुन्या भांडवलदारी जगाची समृद्धी व भरभराट युरोप व अमेरिका यांच्या सहकार्यावरच सर्वस्वी अवलंबून आहे. आंतरराष्ट्रीय बेकारी निवारण, मागस राष्ट्रांच्या विकासकार्याकरता जरूर असलेले नाणे धोरण व मुक्त व्यापार या गोष्टींचे भवितव्यसुद्धा या सहकार्यावरच अवलंबून आहे.

नाटोचे भवितव्य मात्र ठरविणे कठीण आहे. पश्चिम युरोप व रशिया यांचेत समझोता झाल्यास, अमेरिका युरोप यांचे सहकार्यास तडा जाण्याची शक्यता फार आहे. अशा तऱ्हेचा समझोता बहुअंशी जर्मनीच्या निर्लष्करीकरणावर अवलंबून असेल. आज युरोपला सुरक्षित ठेवण्याकरता अमेरिकन लष्कर रशियाला कह्यात ठेवीत आहे. या दोन्ही लष्करातील चढाओढ शीतयुद्धाच्या पलिकडे गेलेली आहे. युरोपचे संघराष्ट्र तयार होऊन, युरोप लष्करी दृष्टया स्वसंरक्षण करण्यास समर्थ होईपर्यंत युरोपमध्ये लष्करी समतोलता राखणे हेही अमेरिकन लष्कराचे एक काम आहे. अमेरिका, रशियापासून जर्मनीचे संरक्षण करीत आहे तर इतर युरोपचे जर्मनीपासूनही संरक्षण करीत आहे. म्हणूनच नाटोविरुद्ध बंड उभारण्याचा द गॉलचा सल्ला कोणत्याही युरोपिअन राष्ट्राने मानला नाही. काही काळानंतर रशिया व अमेरिका यांचेत समझोता झाल्यास हे सर्वच संबंध बदलून जातील. रशियासुद्धा सर्व युरोपचे अमेरिकेशी सहकार्य झाल्यास दुसऱ्या प्रचंड औद्योगिक क्रांतीचे पर्व सुरू होईल.

## पश्चिम युरोप

ब्रिटन, अमेरिकेच्या संपूर्ण वर्चस्वाखाली जात आहे अशी फ्रेंचांनी कितीही ओरड केली तरी ब्रिटन, युरोप व अमेरिका यांच्या जोडल्या जाणाऱ्या संबंधाच्या बाहेर राहू शकणार नाही हे सर्वास माहीत आहे. सध्या युरोपमध्ये सामील होण्याविरुद्ध ब्रिटनमध्ये ओरड चालू आहे. ज्या राष्ट्रसमूहात जर्मनीचा समावेश






आहे त्या समूहाचे पूर्वेशी सलोख्याचे संबंध प्रस्थापित होणे अशक्य आहे असे अनेकांचे म्हणणे आहे. परंतु या म्हणण्यात फारसे तथ्य नाही. कारण जर्मनीचा दृष्टिकोण बदलला आहे. ओडर-निसे रेषा व इव्हां-जे लिस्ट चर्च या संबंधी हेर ग्रॅडेल यांचे पत्रक लवचिक आहे, तर पूर्व जर्मन पुढाऱ्यांशी बोलणी करण्याची पश्चिम जर्मनांची तयारी आहे. या गोष्टी, या बदलाच्या द्योतक होत. रशियाच्या हातातील बाहुले बनलेल्या पूर्व जर्मन पुढाऱ्यांशी बोलणी केल्याखेरीज ऐक्य घडवून आणणे अशक्य आहे याची जाणीव पश्चिम जर्मनीत पुरेशी आहे.

पश्चिम जर्मनीतील परिस्थिती कशीही असली तरी एक गोष्ट मात्र निर्विवाद आहे. व ती म्हणजे पूर्वजर्मनीवरील राजकीय किंवा लष्करी सत्ता सोडण्यास रशिया सहजासहजी तयार होणार नाही. पूर्व युरोपमधील कम्युनिस्ट वजन कमी होण्यास मदत करण्याची रशियाची इच्छा असणे अशक्य आहे. परंतु काही प्रश्नावर रशियाशी देवाणघेवाण करणे शक्य होईल. उदाहरणार्थ पूर्व व पश्चिम जर्मनी यांचेतील व्यापारी संबंध वाढू देण्यास रशिया तयार होईल. कारण युरोप मधील सर्व लहान राष्ट्रांना आपण कोणत्याही पंथाचे असलो तरी आधुनिक जगात सुबत्ता निर्माण करण्याकरता व श्रमविभागाची फळे चाखण्याकरता मोठ्या व्यापारीपेठांशी संबंध ठेवणे अपरिहार्य आहे याची पुरती जाणीव आहे. युगोस्लाव्हियाने कॉमनमार्केटशी संबंध जोडण्यास सुरवातही केली आहे. युगोस्लाव्हिया अनेक बाबतीत पूर्व युरोपचे नेतृत्व करीत असतो हे सर्वास माहीत आहे. अशा परिस्थितीत पूर्व-जर्मनीवर नियंत्रण ठेवणे रशियाला अशक्यच आहे.

पूर्व व पश्चिम जर्मनी यांचेतील भिंतीला भगदाड पडल्यास पूर्व जर्मन राजवट कोलमडेल असे अनेकांना वाटते. परंतु जसजसा काळ अधिक लोटेल तशतशी ही भीती कमी होत जाईल. सुरुवातीस व्यापारी संबंधांपलिकडे दुसऱ्या तऱ्हेचे संबंध निर्माण होणे कठीण आहे. कदाचित् काही काळ तरी राजकीय क्षेत्रात ढवळाढवळ न करण्याचे आश्वासन पश्चिम जर्मनी आपण होऊन देईल. अलिकडे मोठ्या प्रमाणात आर्थिक साहाय्य देण्याचे त्यांनी कबूल केलेच आहे. कॉमनमार्केटशीही पूर्व जर्मनीचे संबंध प्रस्थापित होणे अपरिहार्य आहे. कदाचित् युरोपमध्ये प्रबळ जर्मनी निर्माण न होता, त्याला जर्मनीचे साहाय्य मात्र मिळेल.

अशा परिस्थितीत पूर्व पश्चिम समझोत्यास विरोध ब्रिटिश डाव्या गटाकडून न येता रशियाकडून येण्याची शक्यता जास्त आहे. अॅटलांटिक महासागरापासून पोलिश-रशियन सीमेपर्यंत पसरलेल्या युरोपचा विकास व प्रगती राजनैतिक डावपेचातून न होता आर्थिक सहकार्यामुळे व कॉमनमार्केटच्या प्रभावी धोरणामुळे होणार हे मात्र निश्चित.

**प्रादेशिकता**

आधुनिक जगात कोठल्याही प्रदेशात नजर टाकली तर एक गोष्ट चटकन लक्षात येते, ती म्हणजे परराष्ट्रीय धोरण किंवा लष्करीसत्ता यापेक्षा प्रभावी आर्थिक धोरण जास्त महत्त्वाचे ठरत आहे. युरोप आता राजकीय वावटळीचे केंद्रस्थान राहिला नसल्यामुळे त्याचे बाबतीत तर ते तंतोतंत खरे आहे. पूर्व युरोप व मागस राष्ट्रे या संबंधीचे आर्थिक धोरण युरोपचे परराष्ट्रीय धोरण नक्की करणार आहे. इजिप्त सोडून भूमध्य समुद्राच्या काठचा प्रदेश, पूर्व युरोप व कॉमनमार्केटच्या कक्षेत आलेली पश्चिम आफ्रिकी राष्ट्रे यावर युरोपचे वजन वाढत जाईल. या सर्वांचा परिणाम जागतिक राजकारणात प्रादेशिकता निर्माण होण्यात होईल की काय याची भीती वाटते. अमेरिकेचे लॅटिन अमेरिकेवरील वर्चस्व, रशियाचे पूर्व युरोपवरील वर्चस्व व चीनचे आग्नेय आशियावरील वर्चस्व या प्रादेशिकतेची चिन्हे होत असे म्हटल्यास वावगे होणार नाही. अनेक वर्षे ही प्रादेशिकता प्रत्यक्षात उतरणारही नाही व त्यामुळे सामुदायिक वर्चस्वाचे महत्त्व वाढण्याची पण शक्यता आहे. अमेरिका, रशिया व लालचीन आपल्या शक्ती एकत्र आणू शकतील. आलेल्या संधीचा ही मोठी राष्ट्रे फायदा घेतील का? राजकीय दृष्टचा बलाढ्य झालेला युरोप जागतिक शांतता प्रस्थापित करण्यास समर्थ होईल. अशा युरोपचे नेतृत्व ब्रिटन करणार का?

—दि इकॉनॉमिस्ट, लंडन १४ मे १९६६

---









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष



# एकाच धरती मातेचीं लेकरें

सूर्य फूल वेगवेगळ्या मातीत वाढते — आणि झपाट्याने वाढते.

भारतांत आपण कोणत्याहि भागांत राहत असू, पण आपण सर्व एकाच मातीची लेंकरें आहोत. जितक्या अधिक प्रमाणात आपण हे ओळखू तितक्या लौकर आपला विकास होईल.

एकाच धरती मातेची — भारत मातेची आपण लेंकरें! आपण सर्व एकसाथ मोठे होऊया. झपाट्याने वाढूया.



प्रसिद्धी संचालक, महाराष्ट्र शासन, मुंबई